3926

दी नॅशनल

# इंग्लिश टीचर

[घरबसल्या हंसत—खेळत इंग्रजी शिकविणारा आत्मशिक्षक.]



भाग १।२।३.

P152:4k
111F5

किंमत १॥ रुपया.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

# THE NATIONAL ENGLISH TEACHER.

# दी नॅशनल इंग्लिश टीचर

अर्थात्

# राष्ट्रीय इंग्रजी शिक्षक.



( भाग १, २, ३. )



लेखक,

लक्ष्मण नारायण जोशी.



प्रकाशक,

रा. रा. लक्ष्मण नारायण गोडबोले, बुकसेलर ॲण्ड पब्लिशर,

लक्ष्मी-रोड, पुणें शहर.

( सर्व हक्क प्रकाशकानें स्वाधीन ठेविले आहेत. )

आवृत्ती तिसरी.

---

सन १९२५.

किंमत १॥ रुपया.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

P152:4R
111F5



प्रकाशक,
रा. लक्ष्मण नारायण गोडबोले, बुकसेलर ॲण्ड पाब्लिशर, लक्ष्मी रोड,
पुणें शहर.

मुद्रक,
रा. लक्ष्मण भाऊराव कोकाटे, " हनुमान " छापखाना,
सदाशिव पेठ, घर. नं. ३०० पुणें शहर.



SRI JAGADGURU VISHWARADHYA
JNANA SIMHASAN JNANAMANDIR
LIBRARY.
Jangamwadi Math, VARANASI,
Acc. No. 3926

2142

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

# प्रस्तावना.

हिंदुस्तानांत इंग्रजांचें राज्य सुरू झाल्यापासून इंग्रजी ही राजभाषा प्रचारांत आली. हिंदुस्तानचा व्यापार युरोपियन राष्ट्रांशीं गेल्या शेंदीडशें वर्षांत बराच वाढल्यामुळें या भाषेला जास्तच महत्व आलें. 'राजा कालस्य कारणम्' या न्यायानें ती भाषा प्रत्येकास शिकणें आवश्यक होऊन बसलें आहे. ज्यांचें शिक्षण मराठीच झाल्यानें ज्यांना इंग्रजी भाषेचा गंधहि लागला नाहीं व त्यामुळें ज्यांना व्यापारादि व्यवहारांत अडचण पडते, अशा लोकांकरितांच हें "दी न्याशनल इंग्लिश टीचर" या नांवाचें पुस्तक लिहिलेलें आहे. हें इतक्या सोप्या व साध्या भाषेंत लिहिलें आहे कीं, शिक्षणेच्छूला दुसऱ्याची मदत न घेतां व्यवहारोपयोगी इंग्रजी शिक्षण २।३ महिन्यांत सहज येऊं शकेल.

या पुस्तकाचे एकंदर तीन भाग केलेले आहेत. पहिल्या भागांत प्रथमतः इंग्रजी वर्णमाला, बाराखड्या, वार, महिने वगैरे माहिती दिली असून, इंग्रजी येण्याला ज्याची अत्यंत आवश्यकता आहे त्या व्याकरणाची माहिती सहज रीतीनें ध्यानांत येईल अशा सोप्या भाषेंत देऊन, प्रत्येक धड्याचे शेवटीं शब्दसंग्रह व त्याला अनुसरूनच वाक्यसंग्रह जोडलेला आहे. याप्रमाणें पहिल्या भागांत माहिती देऊन, दुसऱ्या भागांत बोलण्यांतील विशिष्ट वाक्यें, इंग्रजी भाषेंतील म्हणी, व्यावहारिक भाषेंतील वस्तूंच्या नांवांचा शब्दसंग्रह व निरनिराळ्या नित्युपयोगी वाक्यांचा संग्रह केलेला आहे. तिसऱ्या भागांत पत्रव्यवहार, पत्ते लिहिण्याचे नमुने व तारा वगैरे गोष्टी थोडक्यांत दिल्या असून, शेवटीं वर्णानुक्रमाचा शब्दसंग्रह देऊन, त्याच्या आधीं पदव्यादिकांचे अपभ्रंश देऊन तो भाग पुरा केला आहे.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

ज्यांना इंग्रजी येत नाहीं अशा लोकांकरितां 'दी न्याशनल इंग्लिश टीचर' या नांवाचा एक ग्रंथ लिहून काढावा असें माझ्या मनांत बरेच दिवस घोळत होतें. तो माझा हेतु पूर्ण करण्याचे कामीं, येथील सुप्रसिद्ध बुकसेलर व माझे परम प्रिय मित्र रा. रा. लक्ष्मण नारायण गोडबोले यांनीं मदत केली म्हणून माझ्या हातून पार पडतो आहे याबद्दल मी त्यांचा ऋणी आहे. इतकेंच सांगून, ही प्रस्तावना पुरी करतों.

पुणें.
ता. १ जानेवारी १९२२.

पुस्तक-लेखक,
ल. ना. जोशी.

---

## तिसऱ्या आवृत्तीची प्रस्तावना.



दोन्ही आवृत्त्या फारच अल्पावधींत संपल्या, हेंच या पुस्तकाच्या उपयुक्ततेचें स्पष्ट लक्षण होय. या आवृत्तींत—पूर्वींच्या दोन्ही आवृत्तींतल्या बहुतेक चुका दुरुस्त केल्या असून, रचनेंतहि जागोजागीं फरक केलेला आहे. परमेश्वरकृपेनें या आवृत्तीचाहि पूर्वींच्या दोन्ही आवृत्त्यांप्रमाणें माझ्या देशबांधवांस सदुपयोग होवो.

पुणें.
ता. १ मे सन १९२५.

ल. ना. जोशी.



CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

# विषयानुक्रमाणिका.



CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

भाग २ रा.



भाग ३ रा.



CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

॥ श्रीसरस्वति प्रसन्नोस्तु ॥

# THE NATIONAL ENGLISH TEACHER.



# दी नॅशनल इंग्लिश टीचर.

अर्थात्

# राष्ट्रीय इंग्रजी शिक्षक.

## भाग पहिला.



### उपोद्घात.

कोणतेंहि राष्ट्र असो, त्या राष्ट्रावर राज्य करणारी संस्था ज्या भाषेत आपला राज्य-व्यवहार चालवते, ती भाषा त्या राष्ट्रांत व्यवहार करणाऱ्याला येणें अत्यंत आवश्यक असतें. नाहीं तर त्याचा अनेक प्रकारचा व्यवहार लंगडा पडतो. आपली कोणचीहि बाजू कमी अथवा व्यंग असावी असें कोणासहि वाटत नाहीं. आणि म्हणूनच ज्या भाषेच्या योगानें आपला राष्ट्रांतला व्यवहार सुरळीत चालेल ती भाषा शिकण्याचा तो प्रयत्न करतो. हिंदुस्तानांत सध्यां इंग्रज राज्य करीत असल्यानें, बहुतेक सर्व व्यापारधंदे त्यांच्या इंग्रजी भाषेंतच चालतात. ज्याला इंग्रजी भाषा येत नाहीं व हिंदुस्तानांत राहून धंदा करायचा आहे त्यानें ती भाषा शिकणें जरूर आहे. व्यापारधंद्याला पुरेशी भाषा शिकायची आहे आणि विद्यालयांत जाण्यास तर सवड नाहीं, अशांनीं ती भाषा व्यवहारापुरती तरी निदान हस्तगत करून घेणें इष्ट असल्यानेंच तशा प्रकारच्या जनांची प्रवृत्ति, साहजिकपणेंच ती भाषा शिकण्याकडे होते.

जगांतली कोणचीहि भाषा कोणास शिकायची इच्छा झाल्यास त्यास प्रथम त्या भाषेच्या व्याकरणाच्या मुख्य नियमांची माहिती करून घेणें अवश्य असतें. व्याकरणाचे

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

मुख्य नियम समजल्यावांचून, आपण लिहिलेली अथवा बोलतों ती भाषा–शुद्ध आहे कीं अशुद्ध आहे–तें समजणें शक्य नसतें; यास्तव–व्याकरण म्हणजे जें भाषेचें शास्त्र त्याच्या मुख्य मुख्य नियमांची तरी प्रथम माहिती करून घेतली पाहिजे.

या पुस्तकांत. मराठींतून इंग्रजी कसें बोलावें अथवा लिहावें हें स्पष्ट करून सांगितलें आहे. ज्याला मराठी भाषा मुळांतच शुद्ध येणार नाहीं त्याला या पुस्तकावरून तरी तें कसें कळणार ? यास्तव, त्या दोन्ही भाषांची सांगड ज्या व्याकरणाच्या नियमांनीं उत्कृष्टपणें घालतां येईल, ते नियम प्रथम शिकले पाहिजेत. ते व्याकरणाचे म्हणजे भाषाशास्त्राचे नियम काय आहेत, त्याचीच माहिती आतां यापुढें दिली आहे.

वर्णविचार, शब्दविचार आणि वाक्यरचना हे जसे मराठी भाषेच्या व्याकरणाच मुख्य तीन भाग आहेत, तसेच इंग्रजी व्याकरणाचे जरी मुख्य चार भाग आहेत, तरी चौथ्या भागाची म्हणजे काव्यविचाराची ( Prosody–प्रासोडी ) आमच्या या पुस्तकांत फोड केलेली नाहीं. म्हणून—

( १ ) वर्णविचार ( Orthography–) ऑर्थॉग्रफी,
( २ ) शब्दविचार ( Etymology–इटिमॉलोजी ) आणि
( ३ ) वाक्यरचना ( Syntax–सिन्टॅक्स )

या तिहींच्या फक्त येथें मराठीप्रमाणें इंग्रजी व्याकरणाच्या मुख्य भागांची माहिती दिली आहे.

---

## वर्णविचार,

### [ Orthography–ऑर्थॉग्रफी. ]

मराठी भाषेंत जसे एकंदर बावन वर्ण आहेत, तसेच इंग्रजींत सव्वीस वर्ण (अल्फबेट्स–Alphabets ) आहेत. या अवघ्या सव्वीस वर्णांनींच मराठींतल्या बावन वर्णांचें कार्य केलें जातें.

मराठी बावन वर्णांत जसे स्वर आणि व्यंजनें असे वर्णांचें दोन भेद आहे, तसेच इंग्रजींतहि [ व्हॉवेल्स–Vowels ] स्वर आणि [ कॉन्सोनन्टस–Consonants ] व्यंजनें असे दोन भेद आहेत.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

ज्यांच्या साहाय्यानें एखादें अक्षर पूर्ण होतें ते स्वर होत. हे स्वर इंग्रजींत पांच आहेत. ते येणेंप्रमाणें:—

ए A. ई E. आय् I. ओ O आणि यू U.

स्वरांवाचून ज्यांचा पूर्ण उच्चार होत नाहीं, तीं व्यंजनें होत. इंग्रजी भाषेंत हीं जीं एकंदर अठरा आहेत, तीं येणेंप्रमाणें:--

बी B. सी C. डी D. एफ् F. जी G. एच् H. जे J. के K. एल् L.
एम् M. एन् N. पी P. क्यू Q. आर R. एस् S. टी T. व्ही V.
डब्ल्यु W. एक्स X. वाय् Y. झेड् Z.

ह्या एकवीस व्यंजनांपैकीं--डब्ल्यु W आणि वाय् Y हीं व्यंजनें कधीं कधीं स्वर या नात्यानेंहि उपयोगांत आणिलीं जातात. शब्दाच्या किंवा शब्दाच्या अवयवांच्या आरंभीं हीं असल्यावांचून मात्र यांचा स्वरासारखा उपयोग होत नाहीं. याप्रमाणें इंग्रजी भाषेंत एकंदर स्वर आणि व्यंजनें मिळून सव्वीस मूळवर्ण झाले.

इंग्रजी भाषेच्या लिपींत मोठीं [ क्यापिटल–Capital ] आणि लहान [ स्मॉल Small ] अशीं अक्षरें असतात. मराठी भाषेंत जसे लिहिण्याचे बालबोध व मोडी असे दोन प्रकार आहेत, तसेच इंग्रजींतहि रोमन ( Roman ) आणि लहान [ Italix ] असे जरी दोन प्रकार आहेत, तरी पण त्यांत फरक एवढाच आहे कीं, मराठींमध्यें मोडी लिपी ज्याला येत नाहीं तो जसें बालबोध लिहितो, तसा इंग्रजींत रोमन किंवा इटॅलिक लिपी लिहिण्याचा प्रघात नाहीं. मोडी ( स्क्रिप्ट ) म्हणून जो तिसरा एक फक्त लिहिण्याचाच इटॅलिकच्या धरतीचा प्रकार आहे, त्याचा लिहिण्याच्या कामांत उपयोग करितात.

---

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

# इंग्रजी मूळाक्षरें व त्यांचे उच्चार.

| रोमन् बालबोध. | | इटॅलिक. | | मोडी–स्क्रिप्ट. | | मराठी | उच्चार. |
|---|---|---|---|---|---|---|---|
| मोठीं अक्षरें | लहान अक्षरें | मोठीं अक्षरें | लहान अक्षरें | मोठीं अक्षरें | लहान अक्षरें | नांव. | |
| A | a | *A* | *a* | *A* | *a* | ए | अ, आ. अॅ, ए |
| B | b | *B* | *b* | *B* | *b* | बी | ब् |
| C | c | *C* | *c* | *C* | *c* | सी | क्, स् |
| D | d | *D* | *d* | *D* | *d* | डी | ड्, द् |
| E | e | *E* | *e* | *E* | *e* | ई | ए, इ, ई, अ |
| F | f | *F* | *f* | *F* | *f* | एफ् | फ् |
| G | g | *G* | *g* | *G* | *g* | जी | ग्, ज् |
| H | h | *H* | *h* | *H* | *h* | एच् | ह् |
| I | i | *I* | *i* | *I* | *i* | आय | इ, आइ |
| J | j | *J* | *j* | *J* | *j* | जे | ज् |
| K | k | *K* | *k* | *K* | *k* | के | क् |
| L | l | *L* | *l* | *L* | *l* | एल् | ल् |
| M | m | *M* | *m* | *M* | *m* | एम् | म् |

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

| रोमन् बालबोध. | | इटॅलिक. | | मोडी–स्क्रिप्ट. | | मराठीं नांव | उच्चार. |
|---|---|---|---|---|---|---|---|
| मोठीं अक्षरें | लहान अक्षरें | मोठीं अक्षरें | लहान अक्षरें | मोठीं अक्षरें | लहान अक्षरें | | |
| N | n | *N* | *n* | *N* | *n* | एन् | न् |
| O | o | *O* | *o* | *O* | *o* | ओ | ओ, ऑ, अव् |
| P | p | *P* | *p* | *P* | *p* | पी | प् |
| Q | q | *Q* | *q* | *Q* | *q* | क्यु | क |
| R | r | *R* | *r* | *R* | *r* | आर | र् |
| S | s | *S* | *s* | *S* | *s* | एस् | स्, ज् |
| T | t | *T* | *t* | *T* | *t* | टी | ट् |
| U | u | *U* | *u* | *U* | *u* | यू | अ, ऊ |
| V | v | *V* | *v* | *V* | *v* | व्ही | व् |
| W | w | *W* | *w* | *W* | *w* | डब्ल्यु | उ, व् |
| X | x | *X* | *x* | *X* | *x* | एक्स् | क्स् |
| Y | y | *Y* | *y* | *Y* | *y* | वाय | य्, इ |
| Z | z | *Z* | *z* | *Z* | *z* | झेड् | झ |

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

याप्रमाणें इंग्रजींत एकंदर—बालबोध (रोमन) मोठें व लहान आणि मोडी (स्क्रिप्ट) मोठें व लहान—अशीं चार प्रकारांचे वर्ण लिहिण्याची पद्धति आहे.

इंग्रजी लिपींत मोठीं अक्षरें पुढें लिहिल्याप्रमाणें लिहिण्याचा प्रघात आहे:—

(१) प्रत्येक पूर्ण वाक्याच्या सुरुवातीच्या शब्दाचें पहिलें अक्षर.

(२) कवितेच्या प्रत्येक ओळीच्या आरंभींच्या शब्दाचें पहिलें अक्षर.

(३) ईश्वरवाचक शब्दाचें पहिलें अक्षर.

(४) विशेषनामें व त्यांपासून झालेलीं विशेषणें यांच्या आरंभींचीं अक्षरें.

(५) महिने व वार यांच्या शब्दांतलें आरंभींचें अक्षर.

(६) (आय) I (मी) व (ओ) O (अरे) हे एकाक्षरी शब्द नेहमीं मोठ्याच अक्षरांत लिहितात.

(७) एकाद्या लेखांत बाहेरचा एकादा उतारा घ्यावयाचा असल्यास किंवा कोणाच्या तोंडचे शब्द अथवा वाक्य जसाचें तसेंच घ्यावयाचें असल्यास त्याचा प्रारंभ मोठ्या अक्षरानेंच करतात.

(८) वाक्यांतला एखादा महत्वाचा शब्द सुचविणें असल्यास त्याचें आरंभींचें अक्षर मोठेंच लिहितात.

इंग्रजींत इटालिक म्हणून जी एक लिपी आहे तिचीं अक्षरें तिरपीं असतात. त्यांचा फारसा कोठें उपयोग करण्यांत येत नाहीं. ज्यावेळीं एकाद्या वाक्यावर अथवा शब्दावर जोर द्यायचा अथवा लक्ष्य वेधवावयाचें असेल, तेव्हां त्या इटॅलिक लिपीचा उपयोग करतात. त्या लिप्यांचा नमुना मागें तक्त्यावर दिलेलाच आहे.

मागें जो इंग्रजी लिप्यांचा तक्ता दिला आहे, त्यांत प्रत्येक अक्षराचे जे निरनिराळे उच्चार दिले आहेत ते लक्ष्यपूर्वक पाहिले असतां, असें आढळून येईल कीं, इंग्रजी भाषेंतल्या अक्षरांचे उच्चार, एकापेक्षां अधिक होतात. मराठी बावन अक्षरांचें काम इंग्रजी सव्वीस अक्षरें जीं करतात, त्याचें हेंच कारण होय.

---

## मराठी स्वर व त्यांची इंग्रजी मांडणी.

अ a, आ a, इ i, ई ee, उ u, ऊ oo, ऋ ri, ॠ ri, ऌ li, ॡ li, ए a, ऐ ai, ओ o, औ ou, अं am, अः ah.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

## मराठी व्यंजनें व त्यांची इंग्रजी मांडणी.

क् k, ख् kh, ग् g, घ् gh, ङ् n, च् ch, छ् chh, ज् j, झ् jh, ञ n, ट् t, ठ् th, ड् d, ढ् dh, ण् n, त् t, थ् th, द् d, ध् dh, न् n, प् p, फ् ph, ब् b, भ् bh, म् m, य् y, र् r, ल् l, व् v, श् sh, ष् sh, स् s, ह् h, ळ् l, क्ष् ksh, ज्ञ् dna.

हीं वर सांगितल्याप्रमाणें मराठी अक्षरांच्या ऐवजीं इंग्रजी अक्षरें व त्यांची मांडणी एकदां चांगली पाठ झाली, म्हणजे कोणताहि मराठी शब्द इंग्रजी मांडणींत लिहावयाला सोपा जातो.

मराठीप्रमाणेंच इंग्रजींत स्वरांच्या साह्यावांचून व्यंजनें लंगडीं असतात; पण त्यांत फरक इतकाच असतो कीं, मराठींत तीं त्यांचे पाय मोडून लिहितात आणि इंग्रजींत तशी लिहिण्याची पद्धत नाहीं. उदाहरणार्थ व् या मराठी व्यंजनांत अ हा स्वर मिळवला म्हणजे जसें व हें पूर्ण अक्षर बनतें, तसेंच इंग्रजींतहि B व् या व्यंजनांत a अ हा स्वर मिळविला म्हणजे B a व असें पूर्ण उच्चाराचें अक्षर होतें. त्यांतच i आय् मिळवला म्हणजे बि असें अक्षर बनतें. याप्रमाणेंच सर्व व्यंजनांत सर्व स्वर मिळविले म्हणजे इंग्रजी पूर्ण अक्षरें—मराठी बाराखड्या तयार होतात.

---

## मराठी व इंग्रजी बाराखड्या.

| | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| क | का | कि | की | कु | कू | के | कै | को | कौ | कं | कः |
| ka | ka | ki | kee | ku | koo | ke | kai | ko | kau | kam | kah |
| ख | खा | खि | खी | खु | खू | खे | खै | खो | खौ | खं | खः |
| kha | kha | khi | khee | khu | khoo | khe | khai | kho | khau | kham | khah |
| ग | गा | गि | गी | गु | गू | गे | गै | गो | गौ | गं | गः |
| ga | ga | gi | gee | gu | goo | ge | gai | go | gau | gam | gah |

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

घ घा घि घी घु घू घे घै घो घौ घं घः
gha gha ghi ghee ghu ghoo ghe ghai gho ghau gham ghah
ङ ङा ङि ङी ङु ङू ङे ङै ङो ङौ ङं ङः
na na ni nee nu noo ne nai no nau nam nah
च चा चि ची चु चू चे चै चो चौ चं चः
cha cha chi chee chu choo che chai cho chau cham chah
छ छा छि छी छु छू छे छै
chha chha chhi chhee chhu chhoo chhe chhai
छो छौ छं छः
chho chhau chham chhah
ज जा जि जी जु जू जे जै जो जौ जं जः
ja ja ji jee ju joo je jai jo jau jam jah
झ झा झि झी झु झू झे झै झो झौ झं झः
jha jha jhi jhee jhu jhoo jhe jhai jho jhau jham jhah
ञ ञा ञि ञी ञु ञू ञे ञै ञो
yana yana yani yanee yanu yoon yen yein yon
ञौ ञं ञः
yaun yamn yanha
ट टा टि टी टु टू टे टै टो टौ टं टः
ta ta ti tee tu too te tai to tau tam tah
ठ ठा ठि ठी ठु ठू ठे ठै ठो ठौ ठं ठः
tha tha thi thee thu thoo the thai tho thau tham thah
ड डा डि डी डु डू डे डै डो डौ डं डः
da da di dee du doo de dai do dau dam dah
ढ ढा ढि ढी ढु ढू ढे ढै ढो ढौ ढं ढः
dha dha dhi dhee dhu dhoo dhe dhai dho dhau dham dhah

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

| | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ण | णा | णि | णी | णु | णू | णे | णै | णो | णौ | णं | णः |
| na | na | ni | nee | nu | noo | ne | nai | no | nau | nam | nah |
| त | ता | ति | ती | तु | तू | ते | तै | तो | तौ | तं | तः |
| ta | ta | ti | tee | tu | too | te | tai | to | tau | tam | tah |
| थ | था | थि | थी | थु | थू | थे | थै | थो | थौ | थं | थः |
| tha | tha | thi | thee | thu | thoo | the | thai | tho | thau | tham | thah |
| द | दा | दि | दी | दु | दू | दे | दै | दो | दौ | दं | दः |
| da | da | di | dee | du | doo | de | dai | do | dau | dam | dah |
| ध | धा | धि | धी | धु | धू | धे | धै | धो | धौ | धं | धः |
| dha | dha | dhi | dhee | dhu | dhoo | dhe | dhai | dho | dhau | dham | dhah |
| न | ना | नि | नी | नु | नू | ने | नै | नो | नौ | नं | नः |
| na | na | ni | nee | nu | noo | ne | nai | no | nau | nam | nah |
| प | पा | पि | पी | पु | पू | पे | पै | पो | पौ | पं | पः |
| pa | pa | pi | pee | pu | poo | pe | pai | po | pau | pam | pah |
| फ | फा | फि | फी | फु | फू | फे | फै | फो | फौ | फं | फः |
| pha | pha | phi | phee | phu | phoo | phe | phai | pho | phau | pham | pha |
| ब | बा | बि | बी | बु | बू | बे | बै | बो | बौ | बं | बः |
| ba | ba | bi | bee | bu | boo | be | bai | bo | bau | bam | bah |
| भ | भा | भि | भी | भु | भू | भे | भै | भो | भौ | भं | भः |
| bha | bha | bhi | bhee | bhu | bhoo | bhe | bhai | bho | bhau | bham | bhah |
| म | मा | मि | मी | मु | मू | मे | मै | मो | मौ | मं | मः |
| ma | ma | mi | mee | mu | moo | me | mai | mo | mau | mam | mah |
| य | या | यि | यी | यु | यू | ये | यै | यो | यौ | यं | यः |
| ya | ya | yi | yee | yu | yoo | ye | yai | yo | yau | yam | yah |
| र | रा | रि | री | रु | रू | रे | रै | रो | रौ | रं | रः |
| ra | ra | ri | ree | ru | roo | re | rai | ro | rau | ram | rah |
| ळ | ळा | ळि | ळी | ळु | ळू | ळे | ळै | ळो | ळौ | ळं | ळः |
| la | la | li | lee | lu | loo | le | lai | lo | lau | lam | lah |

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

| | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| व | वा | वि | वी | वु | वू | वे | वै | वो | वौ | वं | वः |
| wa | wa | wi | wee | wu | woo | we | wai | wo | wau | wam | wah |
| श | शा | शि | शी | शु | शू | शे | शै | शो | शौ | शं | शः |
| sha | sha | shi | shee | shu | shoo | she | shai | sho | shau | sham | shah |

श प्रमाणेंच षची बाराखडी जाणावी.

| | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| स | सा | सि | सी | सु | सू | से | सै | सो | सौ | सं | सः |
| sa | sa | si | see | su | soo | se | sai | so | sau | sam | sah |
| ह | हा | हि | ही | हु | हू | हे | है | हो | हौ | हं | हः |
| ha | ha | hi | hee | hu | hoo | he | hai | ho | hau | ham | hah |

ळची बाराखडीच लप्रमाणेंच होते.

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| क्ष | क्षा | क्षि | क्षी | क्षु | क्षू | क्षे | क्षै |
| ksha | ksha | kshi | kshee | kshu | kshoo | kshe | kshai |
| क्षो | क्षौ | क्षं | क्षः | | | | |
| ksho | kshau | ksham | kshah | | | | |
| ज्ञ | ज्ञा | ज्ञि | ज्ञी | ज्ञु | ज्ञू | ज्ञे | ज्ञै | ज्ञो |
| dnya | dnya | dnyi | dnyee | dnyu | dnyoo | dnye | dnyai | dnyo |
| ज्ञौ | ज्ञं | ज्ञः | | | | | |
| dnyau | dnyam | dnyah | | | | | |

## इंग्रजी संख्याविचार.

### इंग्रजी अंक.

१ एक-वन्-One 1
२ दोन-टू-Two 2
३ तीन-थ्री-Three 3
४ चार-फोर-Four 4
५ पांच-फाइव्ह-Five 5
६ सहा-सिक्स-Six 6
७ सात-सेव्हन-Seven 7
८ आठ-ऐट-Eight 8
९ नऊ-नाइन-Nine 9
१० दहा-टेन-Ten 10
११ अकरा-इलेव्हन-Elaven 11
१२ बारा-ट्वेल्व्ह-Twelve 12
१३ तेरा-थर्टीन-Thirteen 13
१४ चौदा-फोर्टीन-Forteen 14
१५ पंधरा-फिफ्टीन-Fifteen 15
१६ सोळा-सिक्स्टीन-Sixteen 16
१७ सतरा-सेव्हंटीन-Seventeen 17
१८ अठरा-एटीन-Eighteen 18
१९ एकोणिस-नाइन्टीन-Nineteen 1
२० वीस-ट्वेन्टी-Twenty 20

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

या वीस संख्येपुढील संख्या एकवीसपासून कशी तयार करावी, ती रीति अशी आहे.कीं, प्रत्येक आंकड्याचा दशक घ्यावा व त्याला वर सांगितलेली एकपासून नऊपर्यंत संख्या जोडावी, म्हणजे आपल्याला पाहिजे असेल ती संख्या तयार करून घेतां येते. जसें:--आपल्याला सव्वीस ही संख्या हवी आहे, तर तिचा ट्वेन्टी म्हणजे वीस हा दशक घेऊन त्याला सिक्स म्हणजे सहा ही संख्या जोडली असतां, आपल्याला ट्वेन्टी सिक्स म्हणजे सव्वीस ही संख्या मिळेल. याचप्रमाणें ट्वेन्टी वन् ( २१ ), ट्वेन्टी टू ( २२ ), ट्वेन्टी थ्री ( २३ ), ट्वेन्टी फोर ( २४ ), वगैरे संख्या तयार कराव्या.

## शंभरांपर्यंतचे दशक.

१० दहा–टेन–Ten 10
२० वीस–ट्वेन्टी–Twenty 20
३० तीस–थर्टी–Thirty 30
४० चाळीस–फॉर्टी–Forty 40
५० पन्नास–फिफ्टी–Fifty 50
६० साठ–सिक्स्टी–Sixty 60
७० सत्तर–सेव्हन्टी–Seventy 70
८० ऐंशी–एटी–Eighty 80
९० नव्वद–नाइन्टी–Ninety 90
१०० शंभर–हन्ड्रेड–Hundred 100

यापुढील संख्या वर सांगितल्याप्रमाणेंच करावी.

१०१ एकशें एक–हंड्रेड ॲन्ड वन–Hundred and one 101
११० एकशें दहा–हंड्रेड ॲन्ड टेन–Hundred and ten 110
२०० दोनशें–टू हंड्रेड–Two hundred 200
३०० तीनशें–थ्री हंड्रेड–Thiree hundred 300
४०० चारशें–फोर हंड्रेड–Four hundred 400
५०० पांचशें–फाइव्ह हंड्रेड–Five hundred 500
१००० हजार–थाउजन्ड–Thousand 1000
२००० दोन हजार–टू थाउजन्ड–Two thousand 2000
१००००० लक्ष–हंड्रेडस ऑफ थाउजन्ड–Hundreds of thousand 100000
१०००००० दशलक्ष–मिलियन्स–Millions 1000000
१००००००० कोटि–क्रोअर–Crore 10000000

सध्यांचें चालू साल १९२५आहे. हें इंग्रजींत नाइन्टीन हंड्रेड ॲन्ड ट्वेन्टी फाइव्ह अथवा वन् थाउजन्ड नाइन हंड्रेड ॲन्ड ट्वेन्टी फाइव्ह असें म्हणावयाचें असतें.



CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

## क्रमवाचक संख्या.

पहिला--फर्स्ट--First
दुसरा--सेकंड--Second
तिसरा--थर्ड-Third
चौथा--फोर्थ--Fourth
पांचवा--फिफ्थ--Fifth
सहावा--सिक्स्थ--Sixth
सातवा--सेव्हन्थ--Seventh
आठवा--एट्थ--Eighth
नववा--नाइन्थ--Nineth
दहावा--टेन्थ--Tenth
अकरावा--इलेव्हन्थ--Eleventh
बारावा--ट्वेल्ह्थ--Twelth
तेरावा--थर्टीन्थ--Thirteenth
चौदावा--फोर्टीन्थ--Fourteenth
पंधरावा--फिफ्टीन्थ--Fifteenth
सोळावा--सिक्स्टीन्थ--Sixteenth
सतरावा--सेव्हन्टीन्थ--Seventeenth
अठरावा--एटीन्थ Eighteenth
एकोणिसावा--नाइन्टीन्थ--Nineteenth
विसावा--ट्वेन्टीएथ--Twentyeth
तिसावा--थर्टीएथ--Thirtyeth
एकतिसावा--थर्टीफर्स्ट--Thirty first

¼ एक चतुर्थांश--ए क्वार्टर अथवा वन फोर्थ--A quarter or one fourth ¼
½ एक द्वितीयांश--ए हाफ--On ehalf ½
¾ तीनचतुर्थांश--थ्री फोर्थ--Three fourth ¾
⅔ दोन तृतीयांश--टू थर्ड्स्--Two thirds ⅔
१। सव्वा--वन् ॲन्ड ए क्वार्टर--One and a quarter 1¼
१॥ दीड--वन् ॲन्ड ए हाफ--One and a half 1½
२॥। पावणे तीन्--टू ॲन्ड थ्री फोर्थ--Two and three fourth 2¾

## इंग्रजी संख्या.

एकं--यूनिटस--Units
दहं--टेन्स--Tens
शतं--हंड्रेड्स्--Hundreds
सहस्र--थाउजन्डस्--Thousands
दससहस्र--टेन्स ऑफ थाउजन्डस्--Tens of thousands
लक्ष--हन्ड्रेड्स् ऑफ थाउजन्डस्--Hundreds of thousands

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

दशलक्ष–मिलियन्स–Millions
कोटि–टेन्स ऑफ मिलियन्स–Tens of millions
दशकोटि–हन्ड्रेड्स् ऑफ मिलियन्स–Hundreds of millions
अब्ज–थाउजन्डस् ऑफ मिलियन्स–Thousands of millions
खर्व– टेन्स ऑफ् थाउजन्डस ऑफ् मिलियन्स–Tens of Thousands of millions.
निखर्व–बिलियन्स–Billions
महापद्म–टेन्स ऑफ बिलियन्स–Tens of billions
शंकु–हन्ड्रेडस ऑफ बिलियन्स–Hundreds of billions
जलधि–थाउजडन्स ऑफ बिलियन्स–Thousands of billions
अन्त्य-टेंस ऑफ थाउजन्डस ऑफ बिलियन्स-Tens of thousands of billions
मध्य–हंड्रेडस ऑफ थाउजन्डस ऑफ बिलियन्स–Hundreds of thousands of billions.
परार्ध–ट्रिलियन्स–Trillions.

## रोमन आंकडे.

| | | |
|---|---|---|
| I एक | XII बारा | L पन्नास |
| II दोन | XIII तेरा | XC नव्वद |
| III तीन | XIV चौदा | C शंभर |
| IV चार | XV पंधरा | D पांचशें |
| V पांच | XVI सोळा | M हजार |
| VI सहा | XVII सतरा | |
| VII सात | XVIII अठरा | |
| VII आठ | XIV एकोणीस | |
| IX नऊ | XX वीस | |
| X दहा | XXX तीस | |
| XI अकरा | XL चाळीस | |

यांतील १ते१२पर्यंतचे आंकडे घड्याळाच्या तबकडीवर लिहिलेले सर्वांनीं पाहिलेलेच असतात. इंग्रजी पुस्तकांतील धडे याच आंकड्यांनीं दाखवितात. इंग्रजी इतिहासांतील

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

राजेहि याच आंकड्यांनीं दाखविण्याची वहिवाट आहे. जसें–आठवा हेन्री–Henery VIII. पांचवा जॉर्ज–George V. दुसरा बाजीराव–Bajirao II.

### इंग्रजी महिन्यांचीं नांवें व दिवस.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| जॅन्युअॅरी–January | दिवस | days | | ३१–31 |
| फेब्रुएॅरी–February | ,, | ,, | | २८–२९.–28–29 |
| मार्च–March | ,, | ,, | ,, | ३१–31 |
| एप्रिल–April | ,, | ,, | ,, | ३०–30 |
| मे–May | ,, | ,, | ,, | ३१–31 |
| ज्यून–June | ,, | ,, | ,, | ३०–30 |
| ज्युलै–July | ,, | ,, | ,, | ३१–31 |
| ऑगस्ट–August | ;, | ,, | ;, | ३१–31 |
| सेप्टेंबर–September | ,, | ,, | ,, | ३०–30 |
| ऑक्टोबर–October | ,, | ,, | ,, | ३१–31 |
| नोव्हेंबर–November | ,, | ,, | ,, | ३०–30 |
| डिसेंबर–December | ,, | ,, | ,, | ३१–31 |

ज्या वर्षी फेब्रुएॅरी महिन्याचे दिवस २९ येतात, त्या वर्षास लीप इयर ( Leap year ) असें म्हणतात. हें वर्ष ओळखण्याची अशी रीति आहे कीं, कोणत्याही सनाच्या शेवटच्या दोन आंकड्यांस चार या संख्येनें भागिलें असतां, शून्य उरल्यास तें लीप इयर असें समजावें.

### इंग्रजी महिन्यांची कविता.

सेप्टेंबरीं एप्रिलिं जूनिं पाहीं ॥
नोव्हेंबरीं तीस दिनांस त्याही ॥
वैसे दिनीं मासाचि एक्तिसांचा ॥
अणीक सातां सम मासिकांचा ॥ १ ॥

लीप ईयर फेब्रुएॅरिचें ॥ वसत संतत साच त्रिवार्षिचें ॥
म्हणुनि एकुणतीसचि ते दिन ॥ पडति अष्टविशीं तर्धिं येउन ॥ २ ॥

थर्टी डेज हॅव सेप्टेंबर–Thirty days have September
एप्रिल जून ॲन्ड नोव्हेंबर–April June and November.
ऑल दि रेस्ट हॅव थर्टीवन–All the rest have thirty-one.
एक्सेप्ट फेब्रुएॅरी अलोन–Except February alone.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

## वेळ व काळ.

( टाइम्स ॲन्ड सीझन्स–Times and Seasons. )

| | | |
|---|---|---|
| सकाळ | मॉर्निंग | Morning |
| दुपार | नून | Noon |
| संध्याकाळ | ईव्हिनिंग | Evening |
| रात्र | नाइट | Night |
| मध्यरात्र | मिड-नाइट | Mid-night |
| दिवस | डे | Day |
| मध्यान्ह | मिड्डे | Mid-day |
| आठवडा | वुइक | Week |
| पंधरवडा | फॉर्ट-नाइट | Fort-night |
| महिना | मन्थ | Month |
| वर्ष | इयर | Year |
| दररोज | एव्हरी डे | Every day |
| वेळ | टाइम | Time |
| वक्तशीर | टाइम्ली | Timely |
| ,, | इन टाइम | In time |
| ,, | पंक्चुअल | Punctual |
| वार्षिक | इयर्लि | Yearly |
| मासिक | मन्थलि | Monthly |
| साप्ताहिक | वुइकली | Weekly |
| दरमहा | पर मन्थ | Per Month |
| द्वि साप्ताहिक | बाय वुइक्ली | By weekly |
| दर वर्षी | पर इयर | Per year |
| पंधरवड्याचें | फॉर्टनाइटली | Fortnightly |
| त्रिसाप्ताहिक | ट्रायवुइक्ली | Tryweekly |
| आज | टुडे | Today |

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

| | | |
|---|---|---|
| कालच्या परवां | डे बिफोर यस्टर्डे | Day before yesterday |
| उद्यांच्या परवां | डे आफ्टर टुमॉरो | Day after tomorrow |
| तास | अवर | Hour |
| मिनिट | मिन्युट | Minute |
| पळ | सेकंड | Second |
| शेवटचा | लास्ट | Last |
| शेवटाकडून दुसरा | लास्ट बट वन | Last but one |
| गतवर्षी | लास्ट इयर | Last year |
| पुढच्या साली | नेक्स्ट इयर | Next year |
| काल | यस्टर्डे | Yesterday |
| ऋतु | सीझन | Season |
| वसंत ऋतु | दि स्प्रिंग | The Spring |
| हिंवाळा | दि वुइन्टर | The Winter |
| उन्हाळा | दि समर | The Summer |
| पावसाळा | दि ऑटम | The Autumn |
| पर्जन्यकाळ | दि रेनी सीझन | The Rainy Season |
| उद्यां | टुमॉरो | Tomorrow |
| दिशा | क्वार्टर्स अथवा साइड्स् | Quarters or sides |
| पूर्व | दि ईस्ट | The East |
| पश्चिम | दि वेस्ट | The West |
| दक्षिण | दि साउथ | The south |
| उत्तर | दि नॉर्थ | The North |
| नैर्ऋत्य | दि साउथ वेस्ट | The South West |
| वायव्य | दि नॉर्थ वेस्ट | The North West |

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

| | | |
|---|---|---|
| आग्नेयी | दि साउथ-ईस्ट | The south-east |
| ईशान्य | दि नॉर्थ-ईस्ट | The North-east |
| फुरसत | लीझर | Leasure |
| रिकामा वेळ | लीझर अवर | Leasure hour |
| शतक | सेंचुरी | Century |
| अर्धशतक | हाफ सेंचुरी | Half Century |
| पाव शतक | क्वार्टर सेंचुरी | Quarter Century |

मराठी व इंग्रजी वारांचीं नांवें.

| | | |
|---|---|---|
| रविवार | सन्डे | Sunday |
| सोमवार | मन्डे | Monday |
| मंगळवार | टयूस्डे अथवा च्यूस्डे | Tuesday |
| बुधवार | वेन्स्डे अथवा वेड्नस्डे | Wednesday |
| गुरुवार अथवा बृहस्पतिवार | थर्स्डे | Thursday |
| शुक्रवार | फ्रायडे | Friday |
| शनिवार | सॅटर्डे | Saturday |

---

## वाक्यरचना.

( सिन्टॅक्स–Syntax )

मागील पानांत इंग्रजी भाषेंत एकंदर वर्ण किती आहेत, त्यांच्या जाती किती आहेत, त्यांच्या लिपींचे प्रकार कसे आहेत, त्यांतील मोठ्या व लहान अक्षरांचा उपयोग केव्हां व कसा करण्याचा परिपाठ आहे, मराठीच्या इंग्रजी बाराखड्या कशा करतां येतात वगैरे गोष्टींची माहिती इंग्रजी शिकूं इच्छिणारांस थोडक्यांत सुबसूद समजलीच आहे. आतां

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

येथें मराठींतील ऋ, ॠ व ऌ, ॡ यांचीं इंग्रजी अक्षरें कशीं बनवितां येतात तें स्पष्ट करून, वर दिलेल्या वाक्यरचना या मथळ्यासंबंधानें माहिती करून देतों.

ऋ, ॠ व ऌ, ॡ हे स्वर संस्कृत भाषेतल्या शब्दांत, स्वर आणि व्यंजनें मिळून जी सोळाखडी ( षोडशाक्षरी ) व्हावयाची, तिच्या ऐवजीं मराठींत बाराखडी ( द्वादशाक्षरी ) शिकवण्याचा परिपाठ आहे; आणि त्यालाच अनुसरून मागें मराठीची इंग्रजी बाराखडी कशी होते तें दाखविलें आहे.

आतां ऋ, ॠ व ऌ, ॡ यांची चौखडी ( चतुराक्षरी ) इंग्रजींत कशी करतां येते ती पाहा—

ऋ, ॠ व ऌ, ॡ—या चारी स्वरांची इंग्रजी चौखडी मराठी रु, रू व लृ Ru, Roo & Lu Loo
लु, लु याप्रमाणेंच होत असल्यानें, ती मागील प्रत्येक अक्षरांच्या बाराखडींत देऊन,प्रत्येक बाराखडीला सोळाखडीचें रूप देण्याचा प्रयत्न केला नाहीं, हें यावरून सहजच कळेल.

आतां यापुढें इंग्रजी भाषेंत वाक्यरचना म्हणजे जी वाक्याची जुळणी ती कशी करतात त्याचा विचार करूं. वास्तविक पाहिलें असतां, मराठी व इंग्रजी या दोन भाषांतील वाक्यरचनेंत पुष्कळच फरक आहे आणि तोच आतां प्रथम समजावून घेणें इष्ट आहे. तो फरक जर समजणार नाहीं, तर यापुढील धड्यांतून वाक्यांची जी जुळणी दिली आहे,ती समजणें अशक्य होईल. इंग्रजी वाक्य ( इंग्लिश सेन्टेन्स–English Sentence ) म्हणजे काय ? याचा अर्थ समजण्यासाठीं प्रथम वाक्य म्हणजे काय तें समजणें अवश्य आहे. वाक्य म्हणजे काय ? मराठींत जसें वाक्य पुरें होण्यास कर्ता व क्रियापद यांची जरूरी असते, तशीच इंग्रजींतही असते. कर्ता व क्रियापद हीं वाक्याचीं मुख्य दोन अंगें असतात. तीं जर नसतील, तर वाक्याचा पूर्ण अर्थ कळावयाचा नाहीं. उदाहरणार्थः– जाणें [ गो–Go ] हें नुसतें क्रियापद उच्चारलें, तर कोणी जाणें ? असा सहजीं प्रश्न उद्भवतो. यास्तव, मी जातों [ आय गो–I go ] असें म्हटलें म्हणजे पुरा अर्थ ध्यानांत येतो. याचप्रमाणें—तूं नेतोस [ यू क्यारी–You Carry ], तो करतो [ ही डझ–He does ], ती गेली [ शी वेन्ट–She went ] इत्यादि.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

या उदाहरणांवरून कोणाच्याहि हें लक्षांत येईल कीं, कोणतेंहि वाक्य पुरें होण्यास नुसता कर्ता [ मी, आय–I, तो, ही–He, ती, शी–She ] किंवा नुसतें क्रियापद जाणें [ गो–Go ], नेणें [ क्यारी–Carry ] आणि गेली [ वेन्ट–Went ] हीं क्रियापदें स्वतंत्रपणें वाक्याचा पूर्ण अर्थ समजण्यास उपयोगीं पडत नाहींत. यांस्तव कोणचेंहि वाक्य पुरें होण्यास कर्ता व क्रियापद यांची मुख्यत्वें जरूरी असते.

याप्रमाणें मराठींत आणि इंग्रजींत जेथें एकच कर्ता व एकच क्रियापद असतें अशा दोनच शब्दांच्या वाक्यरचनेंत फरक दिसून येत नाहीं. क्रियापद अकर्मक असल्यास, त्या वाक्यांत क्रियापदाचें कर्म येत नाहीं, पण क्रियापद जर सकर्मक असेल, तर मात्र क्रियापदाला कर्म असणें जरूर असतें. हें कर्म इंग्रजी वाक्यरचनेंत सकर्मक क्रियापदाच्या मागून येतें. जसें:—गजानन दूध पितो [ गजानन ड्रिंक्स मिल्क Gajanan drinks milkl ]. या वाक्यांत ‘ पितो ’ [ ड्रिंक्स–Drinks ] हें क्रियापद असून, त्याचा कर्ता गजानन हा आहे. गजानन काय पितो? दूध पितो. म्हणून, दूध [ मिल्क–milk] हें–पितो–या क्रियापदाचें कर्म आहे. दूध [मिल्क–milk] हा शब्द मराठींत पितो या क्रियापदाच्या आधीं आहे, पण तोच इंग्रजींत क्रियापदानंतर आला आहे. ही मांडणी यापेक्षां अधिक सुलभ रीतीनें समजावी म्हणून, पुढें जें याचें जास्त स्पष्टीकरण केलें आहे त्याकडे नीट लक्ष देणें जरूर आहे.

| | | | |
|---|---|---|---|
| मराठींत | कर्ता<br>गजानन | कर्म<br>दूध | क्रियापद<br>पितो |
| इंग्रजींत | कर्ता<br>गजानन<br>Gajauan | क्रियापद<br>पितो<br>drinks<br>[ ड्रिंक्स ] | कर्म<br>दूध<br>milk<br>[ मिल्क ] |

हीच रचना पुढच्या अधिक उदाहरणांनीं चांगली लक्ष्यांत येईल.

| कर्ता | कर्म | क्रियापद | कर्ता | क्रियापद | कर्म |
|---|---|---|---|---|---|
| मी | शाळा | बघतों— | आय<br>(I) | सी<br>( see ) | स्कूल<br>( school) |

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| तो | पुस्तक | घेतो— | ही<br>(He) | टेक्स<br>(takes) | बुक<br>(book) |
| ती | घरीं | गेली— | शी<br>(She) | वेन्ट<br>(went) | होम<br>(home) |
| तें | पळून | गेलें— | इट<br>(It) | रॅन<br>(ran) | अवे<br>(away) |
| त्यानें | रुपये | घेतले— | ही<br>(He) | टुक<br>(took) | रुपीज<br>(Rupees) |
| त्यांनीं | आंबे | खाल्ले | दे<br>(They) | एट<br>(ate) | म्यांगोज<br>(Mangoes) |
| ते | नाटक | वाचतात | दे<br>(They) | रीड<br>(read) | ड्रामा<br>(drama) |
| तीं | गाणीं | गातात | दे<br>(They) | सिंग<br>(sing) | सॉंग्ज्<br>(Songs) |

हीं वरील वाक्यें मननपूर्वक वाचलीं असतां मराठी व इंग्रजी भाषांच्या वाक्यरचनांच्या पद्धतींत कोणचे फरक आहेत तें लक्षांत येईल. वाक्यरचनेसंबंधानें पुढील मुख्य आठ नियम शिक्षणेच्छूनें अवश्य ध्यानांत ठेवावेत.

(१) प्रत्येक वाक्य—कर्ता व कर्म यांवांचून पुरें होत नाहीं. असेंच केवळ नाहीं.

(२) वाक्यांतलें क्रियापद अकर्मक असल्यास, त्याला कर्माची जरूर नसते.

(३) वाक्यांतलें क्रियापद सकर्मक असल्यास, कर्म लागतेंच असें नाहीं. नसल्यासहि काम भागतें.

(४) मराठी वाक्यांत क्रियापद जसें कर्त्यांच्या मागून येतें तसेंच इंग्रजींतहि तें कर्त्यांच्या मागूनच येतें.

(५) मराठी वाक्यांत क्रियापदाच्या आधीं कर्म येतें, परंतु इंग्रजी वाक्यांत तें क्रियापदाच्या मागून येतें.

(६) कर्त्याचें विशेषण कर्त्यांच्या आधीं त्याच्या जवळच येतें.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

( ७ ) कर्माचें विशेषण म्हणजे जें क्रियाविशेषण तें क्रियापदाच्या आधीं अथवा नंतर, कोठें तरी त्याच्या जवळच येतें.

( ८ ) क्रियापदाचा कर्ता, क्रियापदाजवळच नेहमीं असतो.

या वर दिलेल्या मुख्य आठ नियमांचा मननपूर्वक अभ्यास केल्यास, नवीन शिकणारांना इंग्रजी भाषेतल्या वाक्यरचनेसंबंधानें मुळींच त्रास पडणार नाहीं आणि आपोआप संवयीच्या अभ्यासानेंच वाक्यें करण्याची मोड त्यांच्या अंगवळणीं पडेल.

---

# शब्द–विचार.

## ( इटिमॉलोजी—Etymology ).

शब्दविचार हा भाग वाक्यरचनेच्या आधींच देणें आवश्यक होतें असं जर कोणी म्हणेल, तर त्या बाबतींतला आमचें म्हणणें असें आहे कीं, आधीं झाड दाखवून, मग तें कसें उत्पन्न होतें, हें शिकविण्याची जी सोपी शिक्षणपद्धति, तिलाच अनुसरून, येथें आधीं वाक्यरचना कशी असते हें प्रथम दाखवून, नंतर तें वाक्य कशाचें व कसें बनलेलें असतें, हें दाखवण्याच्या सुलभ मार्गांचा स्वीकार केला आहे.

मराठी भाषेच्या व्याकरणांत शब्दाच्या जशा आठ जाती मानिल्या आहेत, तशाच इंग्रजी भाषेतहि ज्या आठच मानिल्या आहेत, त्या येणेंप्रमाणें:—

१ नाम ( नाउन–Noun ), २ सर्वनाम ( प्रोनाउन–Pronoun ), ३ विशेषण ( ॲड्जेक्टिव्ह–Adjective ), ४ क्रियापद ( व्हर्ब–Verb ), ५ क्रियाविशेषण ( ॲड्व्हर्ब–Adverb ), ६ शब्दयोगी अव्यय ( प्रेपोझिशन–Preposition ), ७ उभयान्वयी अव्यय (कन्जंक्शन–Conjuction), आणि ८ केवलप्रायोगी अव्यय ( इन्टर्जेक्शन–Interjection ).

आतां वरील या आठ जातींपैकीं, एकेक निराळी घेऊन तिचा विचार करूं.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

# नामविचार.

## ( दी नाउन–The Noun )

घोडा, मनुष्य, पारवा, मासा, झाड, देश, रमा, हात, वगैरे दृश्य अथवा अदृश्य, सजीव अथवा निर्जीव–कसेहि पदार्थ असोत, त्यांच्या ठराविक नांवांप्रमाणें त्यांना जी आपण संज्ञा देतों, त्याला नाम ( नाउन–Noun ) असें म्हणतात. याचा अर्थ असा कीं, वस्तु अथवा पदार्थ म्हणजे नाम नव्हे, तर त्याला ओळखण्यासाठीं ठेवले जो पारिभाषिक शब्द तें नाम होय, हें वर दिलेल्या उदाहरणांवरून समजेलच.

इंग्रजी व्याकरणांत नामाच्या ज्या एकंदर पांच जाती आहेत त्या:—

( १ ) विशेषनाम–( प्रॉपर नाउन–Proper Noun ).
( २ ) सामान्यनाम–कॉमन नाऊन्–Common Noun ).
( ३ ) भाववाचकनाम–( ऍब्स्ट्रॅक्ट नाउन–Abstract Noun ).
( ४ ) समुदायवाचक नाम–( कलेक्टिव्ह नाउन–Collective Noun ).
( ५ ) पदार्थवाचक नाम–( मटीरियल् नाऊन–Material Noun ).

# विशेषनाम.

## ( प्रॉपर नाउन–Proper Noun ).

सजीव अथवा निर्जीव कोणचीहि वस्तु असो ती नेमकी ओळखण्यासाठीं भाषेंत तिचें जें नांव–गुणावगुण लक्षांत न घेतां–ठेवतात,त्याला विशेषनाम असें म्हणतात.जसें:-

### मनुष्यांचीं नांवें.

| पुरुष. | स्त्री. |
|---|---|
| रामा–( Rama ) | रमा–( Rama ) |
| गजानन–( Gajanan ) | सरस्वति–( Saraswati ) |
| वामन–( Waman ) | वेणु–( Venu ) |
| विष्णु–( Vishnu ) | लक्ष्मी–( Lakshmi ) |
| हरि–( Hari ) | गंगा–( Ganga ) |
| सदाशिव–(Sadashiv ) | पार्वती–( Parvati ) |

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

नारायण–( Narayan )
गोविंद–( Govind )
लक्ष्मण–( Lakshman )
मोरया–( Moraya )
चिंतामणी–( Chintamani )
माधव–( Madhav )

कमळा–( Kamala )
इंदिरा– ( Indira )
उर्मिळा–( Urmila )
जानकी–( Janaki )
उमा–( Uma )
सावित्री–( Savitri )

---

नद्या.

यमुना ( Yamuna )
सिंधु ( The Sindhu )
नर्मदा ( The Narmada )
तापी ( The Tapi )
कावेरी ( The Kaveri )
ब्रह्मपुत्रा ( The Brahmaputra )

पर्वत.

हिमालय ( The Himalya )
हाला ( The Hala )
सुलेमान ( The Suleman )
सह्याद्रि ( The Sahyadri )
अबू ( The Abu )
मैनाक ( The Mainak )

---

देश

युरोप [ Europe ]
हिंदुस्तान [ Hindustan ]
अमेरिका [ America ]
आफ्रिका [ Africa ]
आशिया [ Asia ]

गांवें

मुंबई [ Bombay ]
लंडन [ London ]
मद्रास [ Madras ]
वॉशिंग्टन [ Washington ]
काबूल [ Kabul ]

वगैरे सर्व विशेषनामें होत.

---

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

## सामान्यनाम.

[ कॉमन नाउन—Common Noun ]

गाय [ काउ–Cow ], कावळा [ क्रो–Crow ], झाड [ ट्री–Tree ] वगैरे शब्द सामान्यनामें होत. सामान्यनाम याचा अर्थ असा कीं ज्याच्यामुळें जातिवाचक शब्द कळतो. पुढील प्रकारचे शब्द हीं सारीं सामन्यनामें होत:—

### इंग्रजी सामान्यनामें

तुकडा [ बिट–Bit ]
मुलगा [ बॉय–Boy ]
पेटी [ बॉक्स–Box ]
मांजर [ कॅट–Cat ]
गाय [ काउ–Cow ]
कुत्रा [ डॉग–Dog ]
बैल [ ऑक्स–Ox ]
गाढव [ ॲस–Ass ]
लेखणी [ पेन–Pen ]
कोल्हा [ फॉक्स–Fox ]
कोंबडी [ हेन–Hen ]
विहीर [ वेल–Well ]
डुक्कर [ पिग–Pig ]
रस्ता [ वे–Way ]
खांच [ पिट–Pit ]
खुंटी [ पेग–Peg ]

### चार अक्षरी इंग्रजी सामान्यनामें.

कावळा [ क्रो–Crow ]
बकरा [ गोट–Goat ]
मुलगी [ गर्ल–Girl ]
जहाज [ शिप–Ship ]
सिंह [ लायन–Lion ]
हात [ हॅन्ड–Hand ]
वेळ [ टाइम–Time ]
पाउस [ रेन–Rain ]
वर्ष [ इयर–Year ]
अंगरखा [ कोट–Coat ]
झाड [ ट्री–Tree ]
पक्षी [ बर्ड–Bird ]
गाणें [ सॉंग–Song ]
मन [ माइन्ड–Mind ]
तंबू [ टेन्ट–Tent ]
खोली [ रूम–Room ]
आठवडा [ वुइक–Week ]
लांकूड [ वुड–Wood ]

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

वांसरूं [ काफ–Calf ]
बायको [ वाइफ–Wife ]
तारा [ स्टार–Star ]
तूप [ घी–Ghee ]

## पांच अक्षरी इंग्रजी सामान्यनामें.

बांक [ बेंच–Bench ]
पशु [ बीस्ट–Beast ]
न्यायाधीश [ जज्ज–Judge ]
मोतीं [ पर्ल–Pearl ]
ऊ [ लाउस–Louse ]
मूल [ चाइल्ड–Child ]
वस्तु [ थिंग–Thing ]
चोर [ थिफ–Thief ]
काठी [ स्टिक–Stick ]
उंदीर [ माउस–Mouse ]
विद्यार्थी [ प्यूपिल–Pupil ]
मुकुट [ क्राऊन–Crown ]
राणी [ क्वुइन–Queen ]
कोंपर [ एल्बो–Elbow ]
मनगट [ रिस्ट–Wrist ]
गाल [ चीक–Cheek ]
तोंड [ माऊथ–Mouth ]
खुर्ची [ चेअर–Chair ]
घर [ हाऊस–House ]
मेज [ टेबल–Table ]
दगड [ स्टोन–Stone ]
नाच [ डॅन्स–Dance ]
रात्र [ नाइट–Night ]
उजेड [ लाइट–Light ]
सुरी [ नाइफ–Knife ]
घोडा [ हॉर्स–Horse ]

## सहा अक्षरी इंग्रजी सामान्यनामें.

पत्र [ लेटर–Letter ]
माकड [ मंकी–Monkey ]
राजपुत्र [ प्रिन्स–Prince ]
राजवाडा [ पॅलेस–Palace ]
हाताचें बोट [ फिंगर–Finger ]
धडा [ लेसन–Lesson ]
रंग [ कलर–Colour ]
सिंहासन [ थ्रोन–Throne ]
बगीचा [ गार्डन–Garden ]
जीभ [ टंग–Tongue ]

## सात अक्षरी इंग्रजी सामान्यनामें.

आवृत्ति [ इडिशन–Edition ]
गुरुत्वाकर्षण [ ग्रॅव्हिटि–Gravity ]
अत्यानंद [ एक्स्टसी–Ecstacy ]
व्याकरण [ ग्रॅमर–Grammer ]

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

ग्रहण [ इक्लिप्स–Eclipse ] अभाव [ डीफॉल्ट–Default ]
मूर्तिपूजक [ हीथन–Heathen ] कुल्ला [ बटक–Buttock ]
मगरूरी [ होटर–Houteur ] राहणारा [ डेनिझन–Denizen ]
शेवट [ एक्स्ट्रीम–Extreme ] चाकरी [ सर्व्हिस–Service ]
फळी–तट [ फॅक्शन–Faction ] दुःख [ ट्रबल–Trouble ]

याप्रमाणें तेरा चौदा अक्षरांचींही सामान्यनामें इंग्रजींत असूं शकतात.

## भाववाचक नामें.

### ( ऍब्स्ट्रॅक्ट नाउन्स–Abstract Nouns. )

जीं नामें पदार्थांची स्थिति; गुण आणि कृति दाखवितात तीं सारीं भाववाचक नामें ( ऍब्स्ट्रॅक्ट नाउन्स–Abstract Nouns ) होत. उदहरणार्थ:—

मूर्खपणा [ स्टुपिडिटि–Stupidity ] प्रामाणिकपणा [ ऑनेस्टी–Honesty]
सौंदर्य [ ब्यूटि–Beauty ] भित्रेपणा [ टिमिडिटि–Timidity ]
दयाळूपणा [ काइन्डनेस Kindness ] निर्दयता [ क्रुएल्टी–Cruelty ]
निष्काळजीपणा [ केअर्लेसनेस–Carelessness ] सत्यता [ ट्रुथ–Truth ]
चांगुलपणा [ गुडनेस–Goodness ] वेडेपणा [ मॅडनेस–Madness ]

## समुदायवाचक नामें.

### ( कलेक्टिव्ह नाउन्स–Collective Nouns. )

ज्यांत अनेक वस्तूंचा अथवा प्राण्यांचा समुदाय असतो, तीं सारीं समुदायवाचक नामें होत. उदाहरणार्थ:—

कळप [ फ्लॉक–Flock ] पंचायत [ ज्यूरी- Jury ]
फळें [ फ्रूट–Fruit ] कचेरी [ कोर्ट–Court ]
सभा [ मीटिंग–Meetting ] कुटुंब [ फॅमिली–Family ]
सैन्य [ आर्मी–Army ] आरमार [ फ्लीट–Fleet ]
मंडळी [ कंपनी–Company] समुदाय [कॉंग्रिगेशन–Congreigation ]

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

## पदार्थवाचक नामें.

[ मटीरियल नाउन्स–material Nouns ]

ज्या वस्तु म्हणजे जे पदार्थ संख्येनें सांगतां येत नाहींत, तीं सारीं पदार्थवाचक नामें ( मटीरियल नाउन्स–Material Nouns ) होत. जसें:—

वाळू ( सॅन्ड–Sand )
पाणी ( वॉटर–Water )
लोखंड ( आयर्न–Iron )
मीठ ( सॉल्ट–Salt )
अन्न ( फूड–Food )
धान्य ( कॉर्न–Corn )
जमीन ( लॅन्ड–Land )
कोंडा ( हस्क–Husk )
भुसकट ( चाफ–Chalf )
माति ( क्ले–Clay )

## क्रियापदें.

[ व्हर्बस्–Verbs. ]

वाक्यांतील एखादी व्यक्ति अगर पदार्थ यांविषयीं जो शब्द जो कांहीं बोध करतो त्या शब्दाला क्रियापद [ व्हर्ब–Verb ] असें म्हणतात. क्रियापदें दोन प्रकारचीं असतात. सकर्मक आणि अकर्मक. ज्याला वाक्यांत कर्म नसतें तें अकर्मक आणि ज्याला वाक्यांत कर्म योजिलेलें असतें तें सकर्मक. पुढें जीं कांहीं क्रियापदें दिलीं आहेत, तीं व्यवहारांत बहुतेक हमेशा फार उपयोगी पडतात, म्हणून तावडतोब इंग्रजी शिकणाऱ्यांनीं तीं पाठ करणें बरें.

| | | |
|---|---|---|
| करणें | ( टु डू ) | To Do |
| देणें | ( टु गिव्ह ) | ,, Give |
| घेणें | ( टु टेक ) | ,, Take. |
| पकडणें | ( टु कॅच ) | ,, Catch. |
| वाचणें | ( टु रीड ) | ,, Read. |
| आवडणें | ( टु लाइक ) | ,, Like. |
| नेणें | ( टु कॅरी ) | ,, Carry. |
| गाणें | ( टु सिंग ) | ,, Sing. |
| अंग धुणें | ( टु बेद ) | ,, Bathe. |
| दिसणें | ( टु सीम् ) | ,, Seem. |



CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

| | | |
|---|---|---|
| पाहणें | ( टु सी ) | ,, See. |
| येणें | ( टु कम ) | ,, Come. |
| चालणें | ( टु वॉक ) | ;, Walk. |
| सांगणें | ( टु टेल ) | ,, Tell. |
| आणणें | ( टु ब्रिंग ) | ,, Bring. |
| जाऊन आणणें | ( टु फेच ) | ,, Fetch. |
| मरणें | ( टु डाय ) | ,, Die. |
| रंगवणें | ( टु डाय ) | ,, Dye. |
| असणें | ( टु बी ) | ,, Be. |
| मारणें | ( टु बीट ) | ,, Beat. |
| ठार मारणें. | ( टु किल ) | ,, Kill. |
| विकणें | ( टु सेल ) | ,, Sell. |
| विकत घेणें | ( टु बाय ) | ,, Buy. |
| खरीद करणें | ( टु पर्चेस ) | ,, Purchase. |
| सांगणें | ( टु टेल ) | ,, Tell. |
| शिकवणें | ( टु टीच ) | ,, Teach. |
| शिकणें | ( टु लर्न ) | ,, Learn. |
| म्हणणें | ( टु से ) | ,, Say. |
| जवळ असणें | ( टु हॅव ) | ,, Have. |
| सुकणें, वाळणें | ( टु ड्राय ) | ,, Dry. |
| थांबणें | ( टु वेट ) | ,, Wait. |
| भांडणें | ( टु क्वारल ) | ,, Quarrel. |
| उसनें देणें | ( टु लेन्ड ) | ,, Lend. |
| उसनें घेणें | ( टु बॉरो ) | ,, Borrow. |
| सुरू करणें | ( टु बिगिन ) | ,, Begin. |
| दाखविणें | ( टु शो ) | ,, Show. |
| रडणें | ( टु क्राय ) | ,, Cry. |

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

## काळविचार.

### ( टेन्स—Tense. )

मराठी व्याकरणांत जसे मुख्य तीन काळ आहेत, तसेच इंग्रजी व्याकरणांतहि वर्तमान ( प्रेझेन्ट–Present ), भूत ( पास्ट–Past ) आणि भविष्यत् ( फ्यूचर–Future ) हे तीन मुख्य काळ ( टेन्सेस–Tenses ) आहेत. मराठी भाषेप्रमाणेंच इंग्रजी भाषेंतहि या मुख्य तीन काळांचे जे पोटभेद आहेत,ते पुढें योग्य स्थळीं सांगण्यांत येतीलच. आतां पहिला जो वर्तमान काळ ( प्रेझेन्ट टेन्स—Present Tense ) त्याबद्दल प्रथम विचार करूं.

### वर्तमान काळ ( प्रेझेन्ट टेन्स–Present Tense ).

काळ हा क्रियापदाच्या रूपावरूनच मुख्यत्वें ओळखायचा असतो. इंग्रजी भाषेंतलें कोणतेंहि क्रियापदाचें मूलरूप कर्त्यांच्या पुढें ठेवलें असतां वर्तमान काळ सिद्ध होतो.

वर्तमानकाळाच्या प्रथम पुरुषाच्या एकवचन आणि अनेकवचन यांच्या रूपांतील मूळ क्रियापदांत बदल होत नाहीं. जसें:—

एक वचन—मी येतों ( आय कम् ) I come.

अनेकवचन—आम्ही येतों ( वुइ कम् ) We come.

इंग्रजींतील मूळ क्रियापदाला ( एस्ट-est ) हा प्रत्यय लाविला असतां, वर्तमान-काळाच्या द्वितीय पुरुषाचें एकवचन सिद्ध होतें. अनेक वचनांत क्रियापदाचें मूलरूपच कायम राहतें. जसें:—मारणें ( टु बीट–To beat ) याचें तूं मारतोस ( दौ बीटेस्ट—Thou beatest ) एकवचन, तुम्हीं मारतां ( यु बीट–You beat ).

मूळ क्रियापदाच्या शेवटीं e हें अक्षर असलें तर वर्तमानकाळीं द्वितिय पुरुषीं नुसता st हाच प्रत्यय लागतो. जसें:—येणें ( टु कम्–To come ) याचें तूं येतोस ( दौ कमेस्ट–Thou comest ) एक वचन, तुम्हीं येतां ( यु कम्-You come) अनेक वचन. मूळ क्रियापद एकावयवी असून त्याच्या शेवटीं जर एकच व्यंजन व त्या व्यंजनाच्या पूर्वी जर एकच स्वर असेल, तर est हा प्रत्यय लागतांना शेवटचें व्यंजन द्वित्त होतें. जसें:—धांवणें ( टु रन्–To run ) याचें–तूं धांवतोस ( दौ रनेस्ट—Thou runnest. )

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

एकाहून अधिक अवयवांच्या क्रियापदाच्या शेवटीं व्यंजन असून, त्या व्यंजनाच्या आधीं जर एकच स्वर असेल व शब्दाच्या शेवटच्या अवयवावर जर जोर पडत असेल, तर est हा प्रत्यय लागतांना शेवटचें व्यंजन द्वित्त होतें. जसें:—परवानगी देणें ( टु परमिट् To permit ) याचें—तूं परवानगी देतोस( दौ परमिटेस्ट–Thou permittest).

मूळ क्रियापदाला s हा प्रत्यय लाविला असतां, वर्तमानकाळाचें तृतीय पुरुषाचें एकवचन सिद्ध होतें. जसें:—मिळणें ( टु गेट्–To get ) याचें—त्याला मिळतें ( ही गेट्स् He gets. ) विचारणें ( टु आस्क–To ask ) ती विचारत्ये ( शी आस्क्स्–She asks ), उडणें ( टु फ्लाये To fly ) तें उडतें ( इट् फ्लाइज्–It flies ). तृतीय पुरुषी अनेकवचनांत क्रियापदाचें मूळचें रूप बदलत नाहीं.जसें:—ते येतात (दे कम्–They come ), त्या जातात ( दे गो They go ), तीं पळतात ( दे रन्–They run)

क्रियापदाच्या शेवटीं s, sh, ch, x, z अथवा o यांपैकीं वर्ण असल्यास,तृतीय पुरुषीं एकवचनीं es हा प्रत्यय लागतो. जसें:—तो शिकवितो ( ही टीचेस्–He teaches ) ती धुत्ये ( शी वॉशेस्–She washes ), तें त्रास देतें ( इट टॅक्सेस् –It taxes ) तें जातें ( इट गोज–It goes ), तो–ती–तें गुंततो–त्ये–तें ( ही,शी, इट–बझेस्–He, she, it buzzes ).

क्रियापदाच्या शेवटीं y हा वर्ण असून त्याच्या मागें जर व्यंजन असेल, तर तृतीय पुरुषीं एकवचनीं es हा प्रत्यय लागतांना Y च्या जागीं I हा वर्ण होतो. जसें-तळणें ( टु फ्राय–To fry ) याचें—ती तळत्ये ( शी फ्राइज–She fries ), सुकविणें ( टु ड्राय–To dry ) तो सुकवितो ( ही ड्राइज–He dries ), प्रयत्न करणें ( टु ट्राय–To try ), तें प्रयत्न करतें ( इट ट्राइज–It tries ).

हे वर सांगितलेलें नियम नीट ध्यानांत आणून, क्रियापदाचा काळ चालवावा. याच्या अधिक खुलाशासाठीं पुढें जीं क्रियापदें चालवून दाखविलीं आहेत,तीं नीट पाहावींत.

### करणें ( टु मेक--To make. )

| | | |
|---|---|---|
| एकवचन—मी करतों | ( आय् मेक–I make ) | प्रथम पुरुष. |
| अनेकवचन आम्हीं करतों | ( वुइ मेक–We make ) | |

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

| | | |
|---|---|---|
| ए. व. तूं करतोस | ( दौ मेकेस्ट–Thou makest ) | द्वितीय पुरुष |
| अ. व. तुम्हीं करतां | ( यू मेक्–You make ) | |
| ए. व. तो करतो | ( ही मेक्स्–He makes ) | तृतीय पुरुष |
| अ. व. तें, त्या, तीं करतात | ( दे मेक्–They make ) | |

सुकणें ( टु ड्राय—To dry )

| | | |
|---|---|---|
| ए. व. मी सुकतों | ( आय ड्राय्–I dry ) | प्रथम पुरुष |
| अ. व. आम्हीं सुकतों | ( वुइ ड्राय–we dry ) | |
| ए. व. तूं वाळतोस | ( दौ ड्राएस्ट–Thou driest ) | द्वितीय पुरुष |
| अ. व. तुम्ही वाळतां | ( यू ड्राय–You dry ) | |
| ए. व. तो वाळतो | ( ही ड्राइज–He dries ) | तृतीय पुरुष |
| अ. व. ते, त्या, तीं वाळतात | ( दे ड्राय–They dry ) | |

इच्छिणें ( टु वुइश–To wish )

| | | |
|---|---|---|
| ए. व. मीं इच्छितों | ( आय वुइश्–I wish ) | प्रथम पुरुष |
| अ. व. आम्हीं इच्छितों | ( वुइ वुइश्–We wish ) | |
| ए. व. तूं इच्छितोस | ( दौ वुइशेस्ट–Thou wishest ) | द्वितीय पुरुष |
| अ. व. तुम्ही इच्छितां | ( यू वुइश्–You wish ) | |
| ए. व. तो इच्छितो | ( ही वुइशेस्–He wishes ) | तृतीय पुरुष |
| अ. व. ते, त्या, तीं इच्छितात | ( दे वुइश्–they wish ) | |

शब्दसंग्रह ( ग्लॉसरी–Glossary )

| | | |
|---|---|---|
| दूध | ( मिल्क् ) | Milk. |
| तूप | ( घी ) | Ghee. |
| चक्का | ( चीज् ) | Cheese. |
| साखर | ( शुगर ) | Sugar. |
| चहा | ( टी ) | tea |
| चमचा | ( स्पून् ) | Spoon. |
| बशी | ( सॉसर ) | Saucer. |
| प्याला | ( कप् ) | Cup. |
| तांदूळ | ( राइस् ) | Rice. |

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

| | | |
|---|---|---|
| डाळ | ( पल्स् ) | Pulse. |
| भाजीपाला | ( व्हिजिटेबल् ) | Vegetable. |
| मीठ | ( सॉल्ट् ) | Salt. |
| लोणी | ( बटर ) | Butter. |
| ताक | ( बटर-मिल्क् ) | Butter-milk. |
| भाकर | ( ब्रेड ) | Bred. |
| तुकडा | ( पीस ) | Piece. |
| घांस | ( मॉर्सेल ) | Morsel. |
| भांडें | ( पॉट ) | Pot. |
| बाजार | ( मार्केट् ) | Market. |
| धान्य | ( कॉर्न् ) | Corn. |
| बुंद | ( कॉफी ) | Coffee. |
| लिंबू | ( लेमन् ) | Lemon. |
| पातीचा चहा | ( लेमन-ग्रास ) | Lemon-grass. |
| आलें | ( जिंजर ) | Ginger. |
| चटई | ( मॅट् ) | Mat. |
| केळें | ( प्लॅन्टेन् ) | Plantain. |
| पाणी | ( वॉटर ) | Water. |
| झरा | ( स्प्रिंग् ) | Spring. |
| विहीर | ( वेल् ) | Well. |
| फळावळ | ( फ्रूट् ) | Fruit. |
| गाय | ( काऊ ) | Cow. |
| म्हैस | ( शी बफेलो ) | She Buffellow. |
| खिशांतलें घड्याळ | ( वॉच ) | Watch. |
| चाकर | ( सर्व्हंट ) | Servant. |

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

| | | |
|---|---|---|
| मेंढी | ( शीप् ) | Sheep. |
| बिछाना | ( बेड् ) | Bed. |
| सतरंजी | ( कार्पेट् ) | Carpet. |
| घोंगडी | ( ब्लॅकेट ) | Blanket. |
| भिंत | ( वॉल् ) | Wall. |
| कागद | ( पेपर ) | Paper. |
| शाई | ( इंक् ) | Ink. |
| लेखणी | ( पेन् ) | Pen. |
| टांचणी | ( पिन् ) | Pin. |
| दऊत | ( इंक्—स्टॅन्ड ) | Ink-stand. |
| मोठें घड्याळ | ( क्लॉक ) | Clock. |
| झगा | ( क्लोक ) | Cloak. |
| विद्यार्थी | ( स्टूडंट ) | Student. |
| अभ्यास | ( स्टडी ) | Study. |
| शहर | ( सिटी ) | City. |
| राजधानी | ( क्यापिटल ) | Capital. |
| खांदा | ( शोल्डर ) | Shoulder. |
| हात | ( हॅन्ड ) | Hand. |
| हा-ही-हें | ( धिस् ) | This. |
| आहे | ( ईज ) | Is. |
| स-ला-ना-तें | ( टु ) | To. |
| तो-ती-तें | ( दी ) | The. |
| पितो | ( ड्रिंक्स ) | Drinks. |

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

| | | |
|---|---|---|
| नीट करणें | [ मेंड ] | Mend. |
| जवळ असतात ( टु हॅव याचा वर्तमान काळ ) | [ ह्यॅज ] | Has. |
| खांदी | [ ब्रँच ] | Branch. |

वाक्यें [ सेन्टेन्सेस्—Sentences ]

हा चहा आहे ( धिस् इज टी ) This is tea.
तो बाजारांत जातो ( ही गोज टु मार्केट ) He goes to market.
नाना केळें देतो ( नाना गिव्हज् ए प्लॅन्टेन ) Nana gives a plantain.
ही सतरंजी आहे ( धिस इज ए कार्पेट ) This is a carpet.
सदू दूध पितो ( सदू ड्रिंक्स मिल्क ) Sadu dirnks milk.
रामा मुंबईस जातो ( रामा गोज् टु बॉम्बे ) Rama goes to Bombay.
गंगू लेखणी करत्ये ( गंगू मेंड्स ए पेन ) Gangu mends a pen.
पुणें हें शहर आहे ( पूना इज ए सिटी ) Poona is a City.
दिल्ली ही राजधानी आहे ( देहेली इज ए क्यापिटल ) Delhi is a Capital.
पाणी आण ( ब्रिंग वॉटर ) Bring water.
आलें घे ( टेक जिंजर ) Take ginger.
तो भाकर खातो ( ही ईट्स ब्रेड ) He eats bread.
ती धान्य आणते ( शी ब्रिंग्ज कॉर्न ) She brings corn.
गाय दूध देते ( काउ गिव्हज् मिल्क ) Cow gives milk.
झाडाला खांदी आहे ( ट्री हॅज ए ब्रॅन्च ) Tree has a branch.
चटई घे ( टेक मॅट ) Take mat.
झऱ्याचें पाणी ( स्प्रिंग-वॉटर ) Spring-water.
विद्यार्थी पुस्तक वाचतो ( स्टुडंट रीड्स् ए बुक ) Student reads a book.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

## वचन—( नंबर—Number. )

व्याकरणरीत्या वचनें जीं दोन आहेत तीं-एकवचन–(सिंग्युलर नंबर–Singular number ) आणि अनेक वचन ( प्ल्यूरल नंबर–Plural number ) हीं होत. एका संख्येच्या नामास सिंग्युलर नंबर म्हणजे एकवचन म्हणतात व ज्या नामाची एकाहून अधिक संख्या असते, त्याला प्ल्यूरल नंबर म्हणजे अनेक वचन असें म्हणतात. जसें:—

| एकवचन. | अनेक वचन. |
| --- | --- |
| घोडा ( ए हॉर्स–A horse ) | घोडे (हॉर्सेस–Horses ) |
| कुत्रा ( ए डॉग–A dog ) | कुत्रीं ( डॉग्ज्–Dogs ) |
| मांजर ( ए कॅट–A cat ) | मांजरें ( कॅट्स–Cats ) |
| पुस्तक ( ए बुक–A book ) | पुस्तकें ( बुक्स्–Books ) |
| टोपी ( कॅप–A cap ) | टोप्या–(कॅप्स्–Caps ) |

नामाच्या शेवटीं y असून त्याच्या मागें जर एखादा स्वर असेल, तर नुसता s हा प्रत्यय लावूनच त्या नामाचें अनेकवचन होतें. यांचीं उदाहरणें:—

| एकवचन. | अनेकवचन. |
| --- | --- |
| माकड ( ए मंकी–A monkey ) | माकडें ( मंकीज–Monkeys ) |
| किरण ( ए रे–A ray ) | किरणें ( रेज्–Rays ) |
| दिवस ( ए डे–A day ) | दिवस ( डेज्–Days ) |
| मुलगा ( ए बॉय–A boy ) | मुलगे ( बॉइज्–Boys ) |
| पाण्याचा भोंवरा (ॲन एडि–An eddy ) | पाण्याचे भोंवरे ( एडिज्–Eddys) |

नामाचें शेवटचें अक्षर जर s, sh, ch किंवा x असेल तर es हा प्रत्यय लाविला म्हणजे त्याचें अनेकवचन होतें. जसें:—

| एकवचन. | अनेकवचन. |
| --- | --- |
| पेटी ( ए बॉक्स–A box ) | पेट्या ( बॉक्सेस्–Boxes ) |
| कुंचला ( ए ब्रश्–A brush ) | कुंचले ( ब्रशेस–Brushes ) |
| गाढव ( एन् ॲस–An ass ) | गाढवें ( ॲसेस–Asses ) |

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

आपण नामांकित लेखक असल्याचा त्याला अभिमान आहे-( ही हॅज प्रायडेड हिमसेल्फ अपॉन बीइंग ए रिनौण्ड रायटर--He has prided himself upon being a renowned writer. )

रामानें रावणाला मारून सीतेला आणिली-( राम ब्रॉट सीता हॅविंग किल्ड रावण -Rama brought Seeta having killed Ravana ).

मीं त्याचीं पुस्तकें चोरिलीं नाहींत-( आय हॅव नॉट राब्ड हिज् बुक्स-I have not robbed his books ).

उन्हाळा संपला आणि पावसाळा लागला-( दि समर फिनिश्ड ऍन्ड रेनी सीझन बिगॅन-The summer finished and rainy season began ).

पावसाळा संपल्यावर हिंवाळा सुरू होईल-( दि वुइन्टर वुइल बिगिन् आफ्टर दि कम्प्लीशन ऑफ रेनी सीझन-The winter will begin after the completion of rainy season ).

त्यानें बाजारांत अनेक जातींचीं फळें खरेदी करून घरीं आणिलीं-( ही ब्रॉट होम व्हेरियस् सॉर्टस् ऑफ फ्रूट हॅविंग पर्चेस्ड इन् दि मार्केट-He brought home various sorts of fruit having purchased in the market ),

## उपपदें —( आर्टिकल्स-Articles ).

इंग्रजी भाषेंत A, An आणि The अशीं तीन उपपदें आहेत. त्यांचा उपयोग त्या भाषेंत विशेषणासारखा करण्यांत येतो. हीं उपपदें फक्त सामान्य नामाच्या मागें लावण्यांत येतात. विशेषनामें, भाववाचक नामें आणि पदार्थवाचक नामें यांच्यामागें सामान्यनामांप्रमाणें उपपदांची योजना करण्याची वहिवाट नाहीं. A आणि An यांना अनियामक उपपदें म्हणजे ( इनडेफिनेट आर्टिकल्स-Indefinite articles ) असें म्हणतात व The याला नियामक उपपद म्हणजे ( डेफिनेट आर्टिकल-Definite article ) असें म्हणतात. पहिलीं दोन अनियामक उपपदें जीं A व An हीं, तीं फक्त एकवचनी नामांच्या मागें येतात आणि तिसरें जें नियामक उपपद The, तें दोन्ही वचनीं व नामाच्या मागें येतें.



CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

अनेक वस्तूंपैकीं सामान्यत्वें एखाद्या वस्तूविषयीं जर बोलावयाचें असेल आणि ती अमकीच वस्तु, आहे असें दाखवावयाचें नसेल, तर ती वस्तु दाखविणाऱ्या सामान्य नामाच्या पूर्वी A किंवा An या अनियामक उपपदाचा उपयोग व्याकरणरीत्या करितात. अनेक वस्तुसंग्रहांतील अमुकच वस्तु असें सांगावयाचें अथवा दाखवावयाचें असल्यास, ती दर्शविणाऱ्या सामान्यनामाच्या आधीं The या नियामक उपपदाचा उपयोग करण्यात येतो. जसें:–ए कौ–( A cow ) अथवा ए गर्ल–( A gril ) म्हणजे अनेक गाईंपैकीं कोणतीहि एक गाय अथवा पुष्कळ मुलींपैकीं कोणती तरी एक मुलगी. The boy ( दि बॉय ) किंवा दी हॉर्स–( The horse ) म्हणजे अनेक मुलांपैकीं अमुकच एक मुलगा व पुष्कळ घोड्यांपैकीं नेमका तोच एक घोडा. The dog–( दी डॉग ) असें म्हटलें, तर अनेक कुत्र्यांपैकीं अमुक एक तोच कुत्रा असा जो अर्थ होतो, त्याचा अर्थ, अमुकच जातीचा अथवा अमक्याच प्रकारचा कुत्रा असा जाणावा.

एकवचनी सामान्य नामाच्या पूर्वी The हें उपपद घातलें असतां, कधीं कधीं त्या सामान्य नामाची जात दाखविली जाते. जसें:—दि डॉग इज ए फेथफुल ॲनिमल ( The dog is a faithful animal ) या ठिकाणीं The च्या अर्थाचा उपयोग सर्वनामाप्रमाणें ' तो ' या अर्थी येथें न करतां, कुत्रा हें एक विश्वासु जनावर आहे असा त्या उपपदाचा जातिवाचक अर्थ होतो.

ज्या सामान्य नामवाचक शब्दाच्या प्रारंभींचें अक्षर, स्वर असतें किंवा ज्या व्यंजनाचा स्वरासारखाच उच्चार करण्याची वहिवाट आहे, त्या शब्दाच्या मागें An हें उपपद लागतें, व ज्या नामवाचक शब्दाच्या प्रारंभीं व्यंजनात्मकच उच्चार असणारा वर्ण असतो त्या मागें A हें उपपद लागतें. जसें:—

| | | | |
|---|---|---|---|
| पाटी | A slate ( ए स्लेट ) | कुत्रा | A dog ( ए डॉग |
| मुलगी | A girl ( ए गर्ल ) | घोडा | A horse ( ए हॉर्स ) |
| पुस्तक | A bock ( ए बुक् ) | टोपी | A cap ( ए कॅप ) |
| गाढव | An ass ( ॲन ॲस ) | जनावर | An animal ( ॲन ॲनिमल ) |
| बेट | An island ( ॲन ऐलंड ) | अंडें | An egg ( ॲन एग्‌ ) |
| दवाखाना | An hospital ( ॲन ऑस्पिटल ) | तास | An hour ( ॲन आवर) |

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

बैल An ox ( ऍन ऑक्स ), छत्री An umbrella ( ऍन अम्ब्रेला ) इत्यादि.

एकवचनी सामान्यनामाच्या पूर्वी स्वर असून, त्याचा उच्चार जर ' यू ( u ) ' असा होत असेल, तर त्या सामान्यनामाच्या आधीं A हें उपपद लाविलें जातें. जसें:—A European ( ए यूरोपियन ), A unit ( ए यूनिट ) वगैरे.

नामाच्या पूर्वी जर त्याचें विशेषण वाक्यांत घालायचें असेल, तर त्या विशेषण-वाचक शब्दाच्या प्रारंभीचें अक्षर पाहून, त्याप्रमाणें A किंवा an यांपैकीं योग्य त्या उपपदाची योजना करण्यांत येतें. अशा वेळीं नामाच्या आद्य वर्णाकडे लक्ष देऊन, स्वर-व्यंजनांच्या भेदाप्रमाणें व्याकरणरीत्या उपपद घालण्याकडे ध्यान देण्याचें कारणच नसतें, जसें:—वाईट मुलगा ( a bad boy ), चांगला गाढव—( a good ass ). उत्तम अंडें ( a fine egg ), तो चांगला घोडा—( The nice horse )वगैरे

विशेषनामाला उपपद लागत नाहीं हें जरी मागें सांगितलें आहे, तरी भूगोल-विषयक अशा कांहीं—पर्वत, महासागर, डोंगर नद्या, समुद्र, देशांचीं नांवें वगैरेंच्या मागें The हें नियामक उपपद घालण्याची इंग्रजी भाषेंत वहिवाट आहे. जसें:—The Tames ( दी टेम्स ) टेम्स नदी, The Cocacious ( दी कॉकेशस ) कॉकेशस पर्वत, The Arictic ocean ( दी आर्टिक ओशन ) आर्टिक महासागर, इत्यादि

विशेषणाचा उपयोग जेव्हां नामासारखा करावयाचा असतो, तेव्हां त्याच्यामागें The हें उपपद लावतात. जसें The paupar ( दी पॉपर ) गरीब लोक, The rich ( दी रिच ) श्रीमंत लोक, The young ( दी यंग ) लहान मुलें, The fools ( दी फूल्स ) मूर्ख लोक, वगैरे.

एखाद्या व्यक्तीशीं संबंध पोंचवायचा असतां आणि त्याच्या गुणाचे निरनिराळे प्रकार दाखवायचे असतां, भाववाचक नामाच्या मागें केव्हां केव्हां उपपद लावतात. जसें:—इंद्रधनुष्यांतील मनोल्हादक रंग—The pleasent colours in the rain-bow ( दी प्लेझेंट कलर्स इन दि रेन-बो ). आकाशगंगेतील सुंदर तारे—The beautiful stars in the galaxy ( दि ब्यूटिफुल स्टार्स इन दि गल्याक्सी ) सृष्टींतल्या चमत्कारिक वस्तु—The wonderful things of nature ( दि वंडरफुल थिंग्ज ऑफ नेचर. )

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

पदार्थवाचक नामांना जेव्हां उपपदें लावण्यांत येतात, तेव्हां त्यांच्या निरनिराळ्या जाती असतात. जसें: –The silk of china ( दि सिल्क ऑफ चायना ) चिनी रेशीम. The sugar of kholapur ( दि शुगर ऑफ कोल्हापूर ) कोल्हापुरी ( गुळी ) साखर. The pearl of Ceylon ( दि पर्ल ऑफ सीलेन ) सिंहलद्वीपी मोत्यें वगैरे.

## शब्दसंग्रह–( Vocabulary–व्होकॅबलरी )

| | |
|---|---|
| सांधा( जॉइंट–Joint ) | व्यास ( डायामिटर–Diametor) |
| लांबी ( लेंग्थ–Length ) | रुंदी ( ब्रेडथ–Breadth ) |
| मजला ( फ्लोअर–Floor ) | जमीन ( लॅन्ड–Land ) |
| संडास ( लॅट्रिन–Latrine ) | आढें ( रूफ–Roof ) |
| कोंपरा ( कॉर्नर–Cornor ) | दगड ( स्टोन–Stone ) |
| तळमजला ( ग्राउन्ड फ्लोअर–Ground floor ) | वीट ( ब्रिक–Brick ) |
| रेती ( सॅन्ड–Sand ) | चुना ( मॉर्टर–Mortor ) |
| खांब ( पोस्ट–Post ) | पाया ( फाउन्डेशन–Foundation) |
| इमारत ( बिल्डिंग–Building ) | नळ ( पाइप–Pipe ) |
| जमीन ( लॅन्ड–Land ) | वार ( यार्ड–Yard ) |
| पाणी ( वॉटर–Water ) | हवाशीर ( एअरी–Airy ) |
| पहिला मजला ( फर्स्ट फ्लोअर—First floor | पायरी ( स्टेप–Step ) |
| तळघर ( सेलर–Celler ) | जिना ( स्टेअर–केस–Stare–case) |
| दुसरा मजला ( सेकंड स्टोरी–Second Story ) | हवा ( व्हेन्टिलेशन–Ventilation |
| उजेड ( लाइट–Light ) | गवाक्ष ( व्हेन्टिलेटर–Ventilator) |
| मजला ( स्टोरी–Story ) | |

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

फळकट ( प्लँक–Plank )
दरवाजा ( डोअर–Door )
कौल ( टाइल–Tile )
वाढणें ( टु प्रिव्हेल To prevail )
उघडी जागा ( ओपन स्पेस–Open spacee)
लांकूड ( टिंबर, वूड–Timber, wood )
विचारपूर्वक ( कान्सिडरिंगली–Consideringly )
निजायाची खोली ( बेड रूम–Bed room )
व्यवस्था ( अॅरेंजमेंट–Arrangement )
जिकडे तिकडे ( एव्हरीव्हेअर–Everywhere )
वचन देणें ( टु प्रॉमिस–To promise )
भाडें ( रेन्ट–Rent )
अव्यवस्था ( डिस्-अरेंजमेंट–Dis-arrangement )
राखून ठेवणें ( रिझर्व–Reserve )
बेते असण ( इन्टेण्ड–Intend )
सर्वांत उंच ( हाय्येस्ट–Highest
बांधलेला ( बिल्ट–Built )
महागाईचा ( कॉस्टली–Costly )
सध्यां ( ऍट प्रेझेन्ट–At present )

तक्तपोशी ( सीलिंग–Cealing )
खिडकी ( वुइन्डो–Window )
महागाई ( डेर्थ–Dearth )
बाजू ( साइड–Side )
रहाणी ( Living )
दिवाणखाना ( हॉल–Hall )
खोलि ( रूम–Room )
मोकळी हवा ( फ्री व्हेन्टिलेशन–Free ventilation )
स्वैपाक घर ( किचन–Kitchen )
स्नानगृह ( बाथ रूम–Bath room )
सभोंवतीं ( अराउन्ड–Around )
दूर करणें ( रिमुव्ह–Remove )
वचन दिलें ( प्रॉमिस्ड–Promised )
गैरसोय ( इन्कन्व्हीनियन्स–Inconvenience )
उघडणें ( टु ओपन–To open )
रहाणें ( टु लिव्ह–To live )
कोठें ( व्हेअर–Where )
खालचा ( लोएस्ट–Lowest )
रहाणें ( टु पुट अप–To put up )
आतां ( नौ–Now )

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

वाढणें ( टु इन्क्रीज्–To increase )
वाढलें आहे ( ईज इन्क्रीज्ड्–Is increased )
बंद करणें ( टु शट अप–To shut up )
पंथ ( कल्ट–Cult )
प्रत्येक खोलीस ( पर रूम–Per room )
सोय ( कन्व्हीनियन्स–Convenience )
घरवाला ( हाउस-ओनर–House-owner )
राजवाडा ( पॅलेस–Palace )

| | | |
|---|---|---|
| राजप्रासाद | [ मॅन्शन ] | Mansion |
| वाटेल तेव्हां | [ ॲट एनी टाइम ] | At any time |
| च्या योगें | [ बाय मीन्स ऑफ ] | By means of |
| च्या पुढें | [ इन् फ्रन्ट ऑफ ] | In front of |
| निजणें | [ टु स्लीप ] | To sleep |
| निजायला जाणें | [ टु गो टु बेड ] | To go to bed |
| सैपाक करणें | [ टु कुक ] | To cook |
| जेवण करणें | [ टु टेक मील्स ] | To take meals |
| झोंपडी | [ हॅम्लेट, कॉटेज ] | Hamlet, cottage |
| स्वच्छ | [ क्लीन ] | Clean |
| स्वच्छता | [ क्लीन्लिनेस ] | Cleanliness |
| टापटीप | [ नीटनेस ] | Neatness |

## वाक्यें—( सेन्टेन्सेस–Sentences. )

एकंदरीनें विचार करतां पुण्याची रहाणी कांहीं मुंबईसारखी फार महागाईची नाहीं [ कान्सिडरिंग ऑफ ऑल दि पॉइन्टस, दि पूना लिव्हिंग इज नॉट सो कॉस्टली ॲज दॅट ऑफ बाम्बे—Considering of all the points the Poona living is not so costly as that of Bombay ]

त्या चाळीला एकंदर संडास दहा आहेत [ देअर आर टेन लॅट्रिन्स् टु दॅट चाळ इन ऑल—There are ten latrins to that chall, in all ]

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

सध्यां मुंबईस दूध आठ आणे शेर आहे ( प्रेझेन्टली देअर इज एट ॲनाज् ए शीर मिल्क ॲट बॉम्बे —Presently there is eight annas a sheer milk at Bombay. )

दिवसें दिवस महागाई फारच होत चालली आहे ( डे बाय डे दि डर्थ इज प्रिव्हे-लिंग मच—Day by day the dirth is prevailing much. ):

घरासभोंवार उघडी जागा असणें जरूर आहे ( इट इज क्वाइट नेसेसरी टु हॅव ॲन् ओपन स्पेस राउन्ड अबाउट दि हौस—It is quite necessary to have an open space round about the house. )

तशा जागेंत बगीचा केला असतां शोभा येऊन, हवा स्वच्छ होते ( इफ गार्डन इज प्रिपेअर्ड इन सच ए प्लेस, इट बिकम्स ए डेकोरेशन ॲन्ड इट प्युरिफाइज् दि एअर-If garden is prepared in such a place, it becomes a decoration and it purifies the air. )

आमचा तोच बेत आहे ( वुइ हॅव दि सेम इन्टेन्शन—We have the same intention. )

दुसऱ्या मजल्यावर तिसऱ्यापेक्षां पाण्याची सोय चांगली आहे ( देअर इज ए गुड कन्व्हीनियन्स ऑफ वॉटर ऑन दि सेकंड फ्लोअर दॅन् दि थर्ड—There is a good convenience of water on the second floor than the third. )

चाळीचा भय्या मोठा उर्मट माणूस आहे ( दि भय्या ऑफ चॉल इज ए व्हेरी ॲरोगन्ट मॅन—The Bhaya of chall is a very arrogant man. )

तो लांचहि खातो ( ही ईव्हन् ॲक्सेप्टस ब्राइब—He even accepts bribe. )

चाळीच्या मालकानें गैरसोय दूर करण्याचें आम्हांला अभिवचन दिलें आहे ( दि ओनर ऑफ दि चॉल हॅज गिव्हन अस ए प्रॉमिस टु रिमूव्ह दि इन्कन्व्हीनियन्स—The owner of the chall has given us a promise to remove the inconvenience.)

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

त्या चाळीच्या भाड्याचें दरमहाचें सव्वीसशें रुपये नक्की उत्पन्न आहे (दि इन्कम ऑफ रेन्ट ऑफ दॅट चॉल पर मन्थ इज ट्वेन्टीसिक्स हंड्रेड् रुपीज नेट—The income of rent of that chall per month is 2600 Rupees nett.)

मी दरमहा पस्तीस रुपये भाडें देतों ( आय पे थर्टी फाइव्ह रुपीज रेन्ट पर मन्थ. I pay thirty-five Rupees rent per month. )

मुंबईत इकडे तिकडे जा, सगळीकडे भाडें वाढलें आहे ( गो एनिव्हेयर इन बॉंबे, दि रेन्ट रज इन्क्रीस्ड एव्हरीव्हेयर—Go anywhere in Bombay the rent is increased everywhere. )

हें मोठें दुर्दैव आहे ( इट इज ए ग्रेट मिसफॉर्च्यून—It is a great misfortune. )

आम्ही मुंबईंत गिरगांवांत शांतारामाच्या चाळींत राहतों · तुम्हीं कोठें असतां ! ( वुइ लिव्ह इन द शान्तारामस चॉल इन गिरगांव ॲट बॉम्बे. व्हेअर यू स्टॉप ? (We live in the Shantarm's chall in Girgaum at Bombay, where you stop ? )

मी सध्या मुंबईस फारसा राहात नाहीं ( आय डू नॉट स्टे ॲट बॉम्बे प्रेझेन्टली इन्व्हेरिएब्ली—I do not stay at Bombay presently inveriably.)

तुमचे वडील काय धंदा करतात ? ( व्हॉट इज युवर फादर ?—What is your father ? )

माझा बाप सरकारी नौकर आहे ( माय फादर इज ए गव्हर्मेंट सर्व्हन्ट—My father is a government servant.)

त्याचा बाप वर्तमानपत्राचा लेखक आहे ( हिज् फादर इज ॲन एडिटर ऑफ ए न्यूजपेपर—His father is an editor of a newspaper. )

जावजी बिल्डिंगजमधली हवा, सुमारें वीसवर्षांपूर्वी फार चांगली होती( दि एअर इन दि जावजी बिल्डिंग्ज वॉज व्हेरी प्लेझेन्ट, सम ट्वेन्टी इयर्स ॲगो—The air in the Javaji-Buildings was very pleasent, some twenty years ago. )

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

तें घर मीं रा. गोपाळरावांपासून विकत घेतलें होतें ( आय हॅड पर्चेस्ड दॅट हौस फ्रॉम मि. गोपाळराव—I had purchased that house from Mr. Gopalrao ).

त्या इमारतीचे चारी मजले अगदीं हवाशीर आहेत ( ऑल दि फोर स्टोरीज् ऑफ दॅट बिल्डिंग, आर क्वाइट एअरी—All the four stories of that building are quite airy).

दहा रुपये वाराप्रमाणें मीं जमीन खरीद करून तिच्यावर दोन चाळी बांधल्या ( आय बिल्ट टू चॉल्स ऑन दि ग्रौन्ड, पर्चेसिंग इट एॅट दि रेट ऑफ टेन रूपीज पर-यार्ड—I built two challs on the ground, purchasing it at the rate of ten rupees per yard )

त्या चाळीच्या प्रत्येक मजल्याला दहा खोल्या आहेत ( ईच स्टोरी ऑफ दॅट चॉल हॅज-टेन रूम्स—Each story of that chall has ten rooms. )

याशिवाय, एक स्वतंत्र स्नानगृह, स्वयंपाकगृह पांच संडास आणि एक दिवाणखाना इतक्या सोई या चाळींत आहेत ( वुइदाउट वुइच, देअर आर सो मेनी कन्व्हीनियन्सेस इन दॅट, देअर इज वन् सेपरेट बाथरूम, वन किचनरूम, फाइव्ह प्रीव्हिज ऍन्ड वन हॉल—Withought which there are so many conveveniences in that chall that, there is one seprerate bath-room, one kitchen room, five previes and one hall. )

चारी मजल्यांवर पाण्याची व्यवस्था ठीक आहे ( ॲरेंजमेन्ट ऑफ वॉटर ऑन ऑल दि फोर स्टोरीज इज गुड्—Arrangement of water on all the four stories is good.)

विस्तृत अंगणानें व बागेनें घराला शोभा येते ( स्पेशिअस कोर्टयार्ड ऍन्ड ए गार्डन बिकम ए हौस Specious courtyard and a garden become a house. )

मोठाल्या घरांना बऱ्याच खोल्या आणि दिवाणखाने असतात ( लार्ज हौसेस हॅव मेनी रूम्स ऍन्ड हॉल्स—Large houses have many rooms and halls. )

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

घरांत आणि आपल्या बसण्याच्या दिवाणखान्यांत नेहमीं स्वच्छता आणि टीप ठेवावी. ( ए हौस ॲन्ड अवर सिटिंग हॉल शुड ऑल्वेज बि केप्ट क्लीन ॲन्ड A house and our sitting hall should always be kept clean and neet.)

दगड, विटा. चुना, लांकूड, आणि लोखंड यांनीं नेहमीं घरें बांधतात ( दि हैसेस आर ऑल्वेज बिल्ट ऑफ-स्टोन्स, ब्रिक्स, मॉर्टर, टिंबर, ॲन्ड आयर्न-The houses are always built of stones, bricks, mortor, timber and iron. )

राजाच्या घराला राजवाडा अथवा राजप्रासाद म्हणतात ( दि किंग्ज हौस कॉल्ड ए पॅलेस ऑर मॅन्शन—The king' s house is called a palace or mansion. )

शेतकऱ्याच्या राहण्याच्या जागेला झोंपडी व गरीबाच्याला घर असें म्हण ( दि फार्मर्स लिव्हिंग प्लेस इज कॉल्ड ए हट् ॲन्ड दॅट ऑफ ए पुअर ए हौस-The farmer's living place is called a hut and that of a poor a house. )

ज्यांत आपण राहतों तें घर, स्नान करतों तें स्नानगृह, आणि जेवतों तें भोजन ( व्हॉट वुइ लिव्ह इन इज ए हौस, इन् व्हॉट वुइ बेथ इज ए. बाथरूम ॲन्ड इन व्हॉट वुइ टेक फुड इज ए पार्लर–What we live in is a house, in what we bathe is a bath-room and in what we take our food is parlor. )

तेथें घराचा तळमजला नेहमीं घाणेरडा असतो ( देअर दि ग्राऊन्ड फ्लोअर दि हौस जइ ऑल्वेज डर्टी–There the ground–floor of the house always dirty. )

तळघर जमीनींत खालीं असतें ( ए सेलर इज अंडर दि ग्राउन्ड–A cellar is under the ground. )

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

घराच्या तळमजल्याच्या खालच्या भागाला घराचा पाया असें म्हणतात–( दि लोअर पार्ट ऑफ ए ग्राऊन्ड–फ्लोअर ऑफ ए हौऊस इज कॉल्ड ए फाउंडेशन–The lower part of a grouud--floor of a house is called a foundation.)

घराचें आढें ह्या घराचा सगळ्यांत उंच भाग आहे–( दि रुफ इज दि हायेस्ट पार्ट ऑफ ऑल दि हौस–The roof is the highest part of all the house. )

घराच्या आणि खोलीच्या आंत व बाहेर आम्हीं दरवाजांनीं जातों–( इन् एन्ड औट ऑफ ए हाऊस एन्ड ए रूम वुइ गो बाय डाअर्स --In and out of a housc and a room we go by doors. )

दरवाजे वाटेल तेव्हां बंद करतां येतात व उघडतां येतात–( एनि टाइम डोअर्स कॅन बी शट ऑर ओपन्ड—Any time doors can be shut or opened. )

घरांत उजेड आणि हवा येण्यास खिडक्यांचा उपयोग होतो —(वुइन्डोज बिकम यूसफुल टु लेट इन दि हौस लाइट ऍन्ड एअर—Windows bicome useful to let in the house light and air. )

खिडक्यांचीं तावदानें कांचेचीं केलेलीं असतात—( पेनेल्स ऑफ वुइन्डोज आर मेड ऑफ ग्लास—Penels of windows are made of glass. )

घराचे दरवाजे आणि खिडक्या लांकडी असतात —(डोअर्स एन्ड वुइन्डोज ऑफ ए हौस आर ऑफ टिंबर—Doors and windows of a house are of timber. )

घराच्या पुढच्या मोकळ्या जागेला अंगण म्हणण्याचा परिपाठ आहे—(सच इज ए प्रॅक्टिस टु कॉल दि ओपन स्पेस इन फ्रन्ट ऑफ ए हाउस, ए कोर्ट-यार्ड—Such is a practice to call the open space in front of a house, a court-yard. )

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

## विशेषण—( एड्जेक्टिव्ह-Adjective )

जो शब्द एकाद्या वस्तूचा गुण, धर्म, संख्या इत्यादि दाखवतो त्याला विशेषण असें म्हणतात. जसें—उत्तम पेरू ( बेस्ट ग्वावा-Best guava ), मूर्ख माणूस ( फूलिश मॅन-Foolish man ), गोड केळें-( स्वीट प्लॅन्टेन-Sweet plantain ), शंभर चोर ( हंड्रेड थीव्हूज-Hundred thieves ), लांब काठी ( लॉंग स्टिक-Long stick ) इत्यादि.

या वरील पांच वाक्यांत जे ( बेस्ट ) उत्तम, ( फूलिश ) मूर्ख, ( स्वीट ) गोड ( हंड्रेड ) शंभर आणि ( लॉंग ) लांब हे पांच शब्द आहेत, ते अनुक्रमें—पेरू, मनुष्य, केळें, चोर व काठी या पांची शब्दांचे कांहीं तरी गुण दाखवीत आहेत, म्हणून ते शब्द त्यांचीं विशेषणें होत. उत्तम या शब्दानें पेरूचा उत्तमपणा, मूर्ख यानें माणसाचा मूर्खपणा, गोड यानें केळ्याचा गोडपणा, शंभर यानें चोरांच्या संख्येचा आणि लांब यानें काठीचा असे गुण, संख्या आणि प्रमाण हीं दाखविलीं आहेत. विशेषणाच्या ज्या एकंदर तीन मुख्य जाती आहेत, त्या येणेंप्रमाणें:—

( १ ) गुणविशेषण—( ॲडजेक्टिव्ह ऑफ क्वालिटी—Adjective of quality ) ( २ ) संख्यावाचक विशेषण ( ॲडजेक्टिव्ह ऑफ नंबर—Adjective of number ) आणि (३) परिमाणवाचक विशेषण—( ॲडजेक्टिव्ह ऑफ क्वान्टिटी Adjective of quantity. )

जो शब्द पदार्थाचा गुण अथवा धर्म दाखवितो तें गुणविशेषण होय. जसें—आंबट लिंबू ( सोअर लेमन-Sour lemon ), तिखट मिरची-( पंजंट चिली-Pungent chilli ), मधुर मध-( स्वीट हनी-Sweet honey ) वगैरे.

जो शब्द एखाद्या वस्तूची संख्या दाखवितो तें संख्याविशेषण ( ॲडजेक्टिव्ह ऑफ नंबर—Adjective of number ) जसें—दुमजली इमारत [ टूस्टोरिड बिल्डिंग-two storied building], वीस मुलांचा वर्ग—[ ए क्लास ऑफ ट्वेन्टी बॉईज्-A class of twenty boys ? ] दोनशें रुपयांची हुंडी—[ ए मनी-ऑर्डर ऑफ टू हंड्रेड रुपीज-A money-order of two hundred rupees ,] इत्यादि

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

जो शब्द पदार्थांचें परिणाम दाखवितो,त्याला परिमाणवाचक विशेषण(ऍडजेक्टिव्ह ऑफ क्वांटिटी ) म्हणतात. जसें:—पुष्कळ माणसांचीं गर्दी—( ए कांग्रिगेशन ऑफ मेनी पीपल्स—A congrigation of many peoples ), यंदां बाजारांत गहूं फारसा आला नाहीं—( दि व्हीट हॅज नॉट कम इन दि बजार मच् धिस् इअर—The wheat has not come in the bazar much, this year ) यंदां आंब्यांची लयलूट होती–(मँगोज वेअर अबन्डन्ठ धिस् इअर–Mangoes were abundant this year ), त्यानें तांदुळाच्या बऱ्याच गोण्या धाडिल्या–( ही सेन्ट मेनी बॅग्ज ऑफ राईस–He sent many bags of rice ), फारशा तेलाची व साखरेची जरूरी नाहीं—( मच ऑईल ऍन्ड शुगर इज नॉट नेसेसरी–Much oil and suger is not necessary. )

या मुख्य तीन विशेषणांशिवाय आणखी जे यांचे तीन पोटभेद आहेत ते येणें-प्रमाणें:— ( १ ) नियमित संख्याविशेषण ( डेफिनेट न्यूमरल् ऍड्जेक्टिव्ह ) ( २ ) अनि-यमित संख्याविशेषण ( इन्डेफिनेट न्यूमरल् ऍड्जेक्टिव्ह ) आणि ( ३ ) विभागदर्शक विशेषण ( डिस्ट्रिब्यूटिव्ह ऍडजेक्टिव्ह ). पहिल्या मुख्य तीन जातींचीं विशेषणें चांगलीं ध्यानांत आलीं म्हणजे हीं पोटभेदांचीं लक्षणें आपोआपच लक्ष्यांत येतात, म्हणून त्यांचें विस्तारानें येथें विवेचन न देतां फक्त नांवेंच दिलीं आहेत.

## शब्दसंग्रह ( व्होकॅब्लरी–Vacabulary )

| | | |
|---|---|---|
| पेढी | [ बँक ] | Bank |
| व्यापारी | [ मर्चंट ] | Merchant |
| ” | [ डीलर ] | Dealer. |
| ” | [ ट्रेडर ] | trader. |
| हुंडी | [ हुंडी ] | Hundi. |
| ” | [ मनी-आर्डर ] | Money-order. |
| पहिल्या दिवशीं | [ ऍट फर्स्ट डे ] | At first day. |
| मान्य करणें | [ टु कन्सेन्ट टु ] | To consent to. |

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

| | | |
|---|---|---|
| भेट | [ व्हिजिट ] | Visit. |
| नुकताच | [ जस्ट ] | Just. |
| गोटी–ट्या | [ मार्बल–ल्स ] | Marble, Marbles |
| भाषा | [ लँग्वेज् ] | Language. |
| प्राचीन | [ एन्शन्ट ] | Antient. |
| अर्वाचीन | [ माडर्न ] | Modern |
| पाश्चिमात्य | [ वेस्टर्न ] | Western |
| पौर्वात्य | [ ओरिएन्टल ] | Oriental. |
| कोट्याधीश | [ मिलिओनर ] | Millionare. |
| खरडपट्टी काढली | [ रिप्रिमॅन्डेड ] | Repremanded. |
| क्षणक्षणींत | [ सिव्हियर्लि ] | Severely. |
| फार | [ व्हेरी ] | Very. |
| मिळणें | [ टु रिसीव्ह ] | To receive. |
| मृत्यु | [ डेथ ] | Death. |
| चातुर्य | [ स्किल् ] | Skill. |
| मनुष्यजाति | [ ह्यूमन काईंड ] | Human-kind. |
| जरूरीच्या | [ इसेन्शियल ] | Essential. |
| ,, | [ नेसेसरी ] | Necessary. |
| रस्ता | [ स्ट्रीट ] | Street |
| मार्ग | [ वे ] | Way. |
| झोंप | [ स्लीप ] | Sleep |
| पायवाट | [ फूट–पाथ ] | Foot–path. |
| पत्र | [ लेटर ] | Letter |
| डाकघर | [ पोस्ट ऑफिस ] | Post office. |
| शिक्का | [ स्टॅम्प ] | Stamp. |
| आंत, मध्यें | [ इन्टु, इन् ] | Into, In. |

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

| | | |
|---|---|---|
| चूक | [ मिस्टेक् ] | Mistake. |
| वर्ग | [ क्लास ] | Class. |
| गैरहजर | [ ऍब्सेंन्ट ] | Absent. |
| गैरहजेरी | [ ऍब्सेन्टी ] | Absentee. |
| हजर | [ प्रेझेन्ट ] | Present. |
| हजेरी | [ प्रेझेन्टी ] | Presenty. |
| सणाचा दिवस | [ हॉलिडे ] | Holyday. |
| चढणें | [ टु क्लाइम्ब ] | To climb. |
| उतरणें | [ टु अलाइट ] | To alight. |
| छापणें | [ टु प्रिन्ट ] | To print. |
| छापिलेलें | [ प्रिन्टेड ] | Printed. |
| ताप | [ फीव्हर ] | Fever. |
| आजी | [ ग्रॅन्ड ममा ] | Grand mama. |
| ,, | [ ग्रॅन्ड मदर ] | ,, Mother. |
| आजा | [ ग्रॅन्ड फादर ] | Grand father. |
| ,, | [ ,, पपा ] | ,, Papa. |
| बाप | [ पपा ] | Papa. |
| ,, | [ फादर ] | Father, |
| सुटीचा दिवस | [ रीसिस डे ] | Recess day. |
| गोष्ट | [ स्टोरी ] | Story. |
| प्रवासी | [ ट्रॅव्हलर ] | Traveller. |
| तंबू | [ टेन्ट ] | Tent. |
| त्रास देणें | [ टु टीज् ] | To Tease. |

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

| | | |
|---|---|---|
| त्रास देणें | [ टु ट्रबल ] | To Trouble. |
| ,, | [ टु अनॉय ] | To Annoy. |
| ,, | [ टु व्हेक्स ] | To Vex. |
| हवा | [ वेदर ] | Wether. |
| वातावरण | [ क्लायमेट ] | Climate. |
| विनंति | [ रिक्वेस्ट ] | Request. |
| पत्रा | [ शीट ] | Sheet. |
| बहुतेक | [ ऑल्मोस्ट ] | Almost. |
| बहुषः, हमेशा | [ यूझ्वली ] | Usually. |
| सरपटणें | [ टु क्रौल ] | To Crowl. |
| जवळ | [ नियर ] | Near. |
| जवळ जवळ | [ निअर ऍन्ड निअर ] | Near and near. |
| भयभीत होणें | [ टु फॉल इन टेरर ] | To Fell in terror |
| ऐकणें | [ टु हिअर ] | To Hear. |
| कान देणें | [ टु लिसन टु ] | To Liston-to. |
| जागें करणें | [ टु अवेक ] | To Awake. |
| जागा केला-झाला | [ अवोक्ड ] | Awoked. |
| पाऊल | [ फुट स्टेप ] | Foot-step. |
| जनावर | [ ऍनिमल ] | Animal. |
| उठला | [ गॉट अप ] | Got up. |
| उठणें | [ टु गेटप ] | To get up. |
| गाढ | [ साउन्ड ] | Sound. |
| निद्रा | [ स्लीप ] | Sleep. |
| घट्ट बसविणें | [ टु फिक्स ] | To Fix. |
| बांधणें | [ टु फासन ] | To fasten. |
| आंवळणें | [ टु बाइन्ड ] | To bind. |

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

| | | |
|---|---|---|
| खडबडणें | ( टु रसल ) | To rustle. |
| ध्वनि, स्वर | ( व्हॉइस ) | Voice |
| शुद्ध | ( प्युअर ) | Pure |
| अशुद्ध | ( इम्प्युअर ) | Impure. |
| लांब | ( लॉंग ) | Long. |
| खोल | ( डीप ) | Deep. |
| खोली | ( डेफ्थ ) | Depth. |
| रुंदी | ( ब्रेड्थ ) | Bredth. |
| श्रीमंत | ( रिच ) | Rich. |
| गोड, मधुर | ( स्वीट ) | Sweet. |
| कडु | ( बिटर ) | Bitter. |
| दयाळू | ( काइन्ड ) | Kind |
| दुष्ट | ( क्रुएल ) | Cruel. |
| म्हातारा | ( ओल्ड ) | Old |
| धीट | ( बोल्ड ) | Bold |
| रानटी, जंगली | ( वाइल्ड ) | Wild. |
| स्वच्छ | ( क्लीन ) | Clean. |
| ,, | ( क्लियर ) | Clear. |
| वाईट | ( बॅड ) | Bad. |
| चांगला | ( गुड् ) | Good. |
| उंच | ( टॉल ) | Tall. |
| गरम | ( वॉर्म ) | Warm. |
| लहान | ( स्मॉल ) | Small. |
| मोठा | ( ग्रेट ) | Great. |
| तरुण, तरणा—णी—णें | ( यंग ) | Young. |
| भित्रा | ( टिमिड ) | Timid. |



CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

| | | |
|---|---|---|
| चकचकीत | ( ब्राइट ) | Bright. |
| थंड | ( कोल्ड ) | Cold |
| अशक्त | ( वुइक ) | Weak. |
| सशक्त | ( स्ट्रॉंग ) | Strong. |
| मुका | ( डम्ब ) | Dumb. |
| बहिरा | ( डेफ ) | Deaf. |
| अंधळा | ( ब्लाइन्ड ) | Blind. |
| पांगळा | ( लेम् ) | Lame. |
| शहाणा | ( वाइज् ) | Wise. |
| विश्वासू | ( फेथ्फुल् ) | Faithful. |
| मठ्ठ | ( डल ) | Dull. |
| आनंदकर | ( प्रेटी ) | Pretty. |
| दुःखी | ( सॉरी ) | Sorry. |
| सुखी | ( हॅपी ) | Happy. |
| देखणा | ( हॅन्डसम ) | Handsome. |
| उद्योगी | ( बीझी ) | Busy. |
| छानदार | ( फाइन् ) | Fine. |
| खोटा | ( फॉल्स ) | False. |
| चपळ | ( ऍक्टिव्ह ) | Active. |
| थोडा | ( फ्यू ) | Few. |
| पुष्कळ | ( मेनी ) | Many. |
| ,, | ( मच ) | Much. |
| सारा सर्व | ( होल ) | Whole. |
| ,, ,, | ( ऑल ) | All. |
| कुरूप | ( अग्ली ) | Ugly |
| घाणेरडा, ओंगळ | ( डर्टी ) | Dirty. |

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

| | | |
|---|---|---|
| सुंदर, देखणा | ( ब्यूटिफुल ) | Beautiful. |
| आंबट | ( सोअर ) | Sour. |
| आजारी | ( इल्, सिक् ) | Ill, sick. |
| कित्येक | ( सेव्हरल् ) | Several. |
| पांढरा, सफेत | ( व्हाइट ) | White. |
| तांबडा, लाल | ( रेड ) | Red. |
| हिरवा | ( ग्रीन ) | Green. |
| पिवळा | ( यलो ) | Yellow. |
| निळा | ( ब्ल्यू ) | Blue. |
| काळा | ( ब्लॅक ) | Black. |
| गुलाबी | ( पिंक ) | Pink. |
| किरमिजी | ( क्रिम्झन् ) | Crimson. |
| कांहीं | ( सम ) | Some. |
| प्रत्येक | ( ईच, एव्हरी ) | Each, every. |
| योग्य | ( प्रॉपर ) | Proper. |
| उंच | ( हाय ) | High. |
| नवा | ( न्यू ) | New. |
| ताजा | ( फ्रेश् ) | Fresh. |
| आळशी | ( आयडल् ) | Idle. |
| गळेकापू | ( कट–थ्रोट ) | Cut–throat. |
| कृतघ्न | ( अनग्रेटफुल ) | Ungrateful. |
| कृतज्ञ | ( ग्रेटफुल ) | Grateful. |
| नीच | ( मीन ) | Mean. |
| फसव्या | ( चीट ) | Cheat. |
| लबाड. | ( लायर ) | Lier. |

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

## वाक्यें.—( सेन्टेन्सेस–Sentences ).

माझा थोरला भाऊ मोठा लबाड आहे–( माय एल्डर ब्रदर इज ए ग्रेट चीट– My elder brother is a great cheat.]

माझ्या वाईट काळाचा फायदा घेऊन, त्यानें मला फसविलें आहे—[ ही हॅज चीटेड मी, टेकिंग ॲडव्हॅन्टेज ऑफ माय बॅड डेज्—He has cheated me, taking advantage of my bad days.

तो किंग लियर नाटकांतली एडमण्डची भूमिका माझ्याशीं खेळतो आहे—[ ही इज प्लेइंग दि पार्ट ऑफ एडमंड वुइथ मी, इन दि ड्रामा ऑफ किंग लियर—He is playing the part of Edmond with me; in the drama of King Lear. ]

मी तापानें आजारी होतों तेव्हां त्यानें मला छळिलें—[ ही इल्–ट्रीटेड मी व्हेन आय वॉज इल् ऑफ फीवर–He ill–treated me when I was ill of fever. ]

प्रत्येक वेळीं त्याच्या व बायकोच्या चुका झालेल्या आहेत [ ही ॲन्ड् हिज वाइफ हॅव मेड मिस्टेक्स ॲट ईच टाईम—He and his wife have made mistakes at each time. ]

त्याची बायको त्याला त्याच्या स्वभावाला शोभेशीच मिळालेली आहे—[ही हॅज गॉट हिज वाइफ बिफिटिंग हिज नेचर—He has got his wife befitting his nature. ]

त्या वर्गांतील तो मुलगा आतांशा नेहमीं गैरहजर राहतो–[ दॅट बॉय इन दॅट क्लास इज ऑल्वेज ॲब्सेन्ट नौ ए डेज–That boy in that class is always absent now a days. ]

माझा बाप रोज गाईचें अर्धा शेर दूध पीत असे—[ माय फादर वॉज ड्रिंकिंग डेलि हाफ ए शेर काऊज् मिल्क—My father was drinking daily half a sheer cow's milk-]

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

हजर असलेल्या सर्व माणसांनीं माझी स्थिति पाहिली आहे— [ ऑल दि पर्सन्स प्रेझेन्ट, हॅव एक्स्पीरियन्स्ड माय स्टेट–All the Persons-Present, have experienced my state. ]

मी सरस्वती देवीच्या प्रसादावर पोट भरीत आलों आहें—[ आय हॅव बीन फीडिंग मायसेल्फ ऑन दि फेव्हर ऑफ दि गॉडेस ऑफ नॉलेज—I have been feeding myself on the favour of the Godess of knowledge]

मी आजपर्यंत जीं सुमारें साठ सत्तर पुस्तकें लिहिलीं, तीं सारीं छापिलेलीं आहेत [ दि बुक्स वुइच आय हॅव रिटन अप टिल नौ नियर्ली सिक्स्टी ऑर सेव्हन्टी हॅव ऑल बीन प्रिन्टेड—The books which I have written up till now nearly sixty or seventy have all been Printed. ]

आमच्या बापाचें व आईचें देहावसान झालेलें पाहून आमच्या भावाला कष्टी होण्याच्या ऐवजीं आनंद झाला–[ आवर ब्रदर बिकेम ग्लॅड इन्स्टेड ऑफ सॉरी, सीइंग दि डेथ्स् ऑफ अवर फादर ऍन्ड मदर—Our brother became glad instead of sorry, seeing the deaths of· our· father and mother. ]

तो आतां माझ्या मरणाची वाट पाहतो आहे—[ ही इज नौ वेटिंग माय डेथ He is now waiting my death ].

पण तसें करण्याचें आतां कांहींच कारण राहिलें नाहीं—[बट् देअर इज नो रीझन नौ रिमेन्ड फॉर हिम् टु डु सो–But there is no reason now remained for him to do so. ]

मी जीवंत आहें हेंच कारण असल्यास न कळे—[ डू नॉट नो इफ धिस इज दि रीझन, दॅट आय ॲम लिव्हिंग—Do not know if this is the reason that I am living. ]

चोर पुष्कळ पाहिले, पण दुसऱ्यांच्या देखत प्रत्यक्ष आपल्या भावाच्या मुलाची चोरी करणारा निर्लज्ज माणूस एकच पाहिला—[ सॉ मेनी थीव्ज, बट सॉ ओन्ली वन शेमलेस मॅन मिसप्रोप्रिएटिंग डॉउनराइटली दि सन ऑफ हिज ओन ब्रदर इन दि

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

प्रेझेन्स ऑफ अदर्स-Saw many thieves,but saw only one shameless man, misappropriating downrightly the son of his own broher, in the presence of others. ]

ईश्वराला हें कसें सहन होतें हें समजत नाहीं—[ डू नॉट नो हौ गॉड फर्बेअर्स धिस्-Do not know how god forebears this. ]

त्यांत त्याचा कांहीं तरी गुप्त हेतु असेल असें म्हटल्यावांचून मनाची शांति होत नाहीं—[ माइन्ड डझ नॉट सॅटिस्फाय अन्लेस् थिंकिंग दॅट, देअर मस्ट बी हिज् सम सिक्रेट इन्टेन्शन इन डुइंग सो—Mind does not satisfy unless thinking that there must be his some secret intention in doing so. ]

कारण ईश्वर सर्वज्ञ आणि सर्वकारक आहे—[बिकॉज गॉड इज ऑम्निसाएन्ट ऍन्ड ऑम्निपोटेन्ट—Because God is omniscient and omnipotent. ]

तो आळशी मनुष्य आपल्या कामावर दुर्लक्ष करतो म्हणून त्याची खरडपट्टी काढली जाते-[ दि आयडल मॅन इज सिव्हियर्ली रिप्रिमॅन्डेड फॉर नॉट बीइंग अटेन्टिव्ह् टु हिज ओन वर्क—The idle man is severely repremanded for not being attentive to his own work. )

त्या व्यापाऱ्याची साखर आणि तेल विकावयाचीं आहेत—[ शुगर ऍन्ड ऑईल ऑफ दॅट ट्रेडर आर टु बी सोल्ड—Sugar and oil of that trader are to be sold. ]

मी आणि माझा कारकून पेढीवरून आम्ही नेहमीं पैसे आणतों—[ आय ऍन्ड माय क्लार्क वुइ आल्वेज ब्रिंग मनी फ्रॉम दि बँक—I and my clerk we always bring money from the bank. ]

तो मला केव्हांच भेटला नाहीं—[ ही डिड् नेव्हर सी मी—He did never see me. ]

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

बरींच माणसें सात ते आठ तास झोंप घेतात, पण मला तीन किंवा चार तास पुरेशी होते—( मेनी पर्सन्स स्लीप फ्रॉम सेव्हन टु एट अवर्स, बट इट बिकम्स साफिशन्ट फॉर मी फ्रॉम थ्री टु फोर आवर्स—Many persons sleep from seven to eight hours; but it becomes sufficient for me from three to four hours. )

मीं येथें माझ्या वयाचीं पन्नास वर्षें घालविलीं आहेत—( आय हॅव्ह स्पेंट हिअर फिफ्टी इयर्स ऑफ माय एज—I have spent here fifty years ef my age. )

जेवणानंतर मला जरा वामकुक्षी करावी लागते—( आय रिक्वायर ए लिटल स्वीट स्लंबर आफ्टर मील—I require a little sweet slumber after meal ).

ताज्या हवेनें प्रकृति बिघडत नाहीं—( फ्रेश एअर डझ नॉट मेक इल कॉन्स्टिट्यूशन—Fresh air does not make ill constitution ).

तो स्वतःच्या अज्ञानानें गर्विष्ठ आहे–( ही इज प्राऊड ऑफ हिज् ओन इग्नरन्स—He is proud of his own ignorance ).

तुमचें पत्र आलेलें वाचून मला फार आनंद वाटला-( आय वॉज व्हेरी मच ग्लॅड टु रीड युवर लेटर—I was very much glad to read your letter )

तो परदेशीं गबर होऊन स्वदेशीं आला—( ही केम होम बीइंग रिच ॲब्रॉड—He came home being rich abroad ).

प्राचीन आणि अर्वाचीन भाषांचा तो ज्ञाता आहे—( ही इज वेल व्हर्स्ड इन दि प्रिमिटिव्ह ॲन्ड मॉडर्न लॅंग्वेजिस्—He is well versed in the primitive and modern languages ).

ते मुलगे गोट्यांनीं खेळत होते त्यावेळीं मी आलो—( आय केम व्हेन दि बाइज वेअर प्लेइंग वुइथ मार्बल्स—I came when the boys were playing with marbles.)

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

कलियुगांतले रामलक्ष्मण आणि सत्ययुगांतले रामलक्ष्मण यांत महदंतर आहे [ देअर इज ए व्हास्ट डिफरन्स बिटवीन दि राम ॲण्ड लक्ष्मण ऑफ दि आयर्न एज् ॲन्ड दॅट ऑफ दि गोल्डन एज—There is a vast difference between the Rama and Lakshman of iron age and that of the golden age ].

पुण्यांत उन्हाळा नुक्ताच सुरू झाला होता–[ दि समर हॅड रीसेन्टली बिगन इन पूना—The summer had recently begun in Poona ].

उन्हाळ्यांत शाळांना सुट्या होतात, म्हणून मुलें आपापल्या घरीं जातात–[ बॉईज् गो टु देअर होम्स, ॲज स्कूल्स आर क्लोज्ड इन दि समर—Boys go to their homes, as schools are closed in the summer. ]

प्रवाशांच्या गोष्टी वाचण्याचा नाद असणें फार चांगलें—[ इट इज ए व्हेरी गुड हॅबिट ऑफ रीडिंग स्टोरीज अबाउट ट्रॅव्हेलर्स—It is a very good habit of reading stories of travellers ].

त्यांनीं नंतर तंबूंत जरी राहण्याचा विचार केला होता, तरी ते गेले नाहींत–[ दे डिड् नॅाट गो, दो दे देन थॅाट ऑफ गोइंग टू लिव्ह इन ए टेन्ट–They did not go, though they then thought of going to live in a tent.)

जिकडे तिकडे इतकें शांत होतें कीं वाऱ्याची सुद्धां हालचाल होत नव्हती–( इट वॉज सो स्टिल् एव्हरीव्हेअर, दॅट ईव्हन दि मुव्हमेन्टस् ऑफ एअर वेअर स्टॉप्ड— It was so still everywhere, that even the movements of air were stopped. )

झाडांच्या पानांचा अवाजसुद्धां होत नव्हता—( देअर वॉज नो रस्ट्लिंग नॉइज ईव्हन ऑफ ट्री-लीव्हज्—Thre was no rustling noise even of tree-leaves. )

मध्यरात्रीं तो जागा झाला आणि त्यानें पलीकडे कांहीं अंतराबर पावलांचा आवाज ऐकला—( ही अवोक ॲट मिडनाइट ॲन्ड हर्ड सम् साउन्ड ऑफ फुटस्टेप बियॉन्ड

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

सम डिस्टन्स—He awoke at midnight and heard some sound of footsteps beyond some distance ).

आम्ही सगळे उठलों व शांतपणें तो आवाज ऐकत बसलों-( वुइ गॉट अप ऑल एन्ड सॅट सायलेन्ट हिअरिंग दॅट नॉईज—We got up all and sat silent hearing that noise )

## विशेषणांचे तारतम्यभाव.

( दि डिफरन्सेस् ऑफ ॲडजेक्टिव्हज्–The differences of adjecbtives)

इंग्रजी व्याकरणांत गुणविशेषणाचे ( Adjective of quality) ) जे तारतम्यभाव दिलेले आहेत व त्यांचे जे तीन प्रकार असतात ते येणेंप्रमाणें:–मूळरूप [पॉझिटिव्ह डिग्री–-Positve degree ] (२) कमी अधिक प्रमाण [ कम्पॅरेटिव्ह डिग्री Comparative degree ] (३) आणि एकाच जातच्या वस्तुसंग्रहांपैकीं, एकाचें सर्वांहून गुणापेक्षां कमी अधिक प्रमाण दाखविणारें जें तें [ सुपर्लेटिव्ह डिग्री–Superlative degree ] जसें:—

तो मनुष्य श्रीमंत आहे—( दि मॅन इज रिच–The man is rich ) ( पॉझिटिव्ह डिग्री )

तो मनुष्य त्यांच्यापेक्षां श्रीमंत आहे [ दि मॅन इज रिचर दॅन देम–The man is richer than them ] ( कम्पॅरेटिव्ह डिग्री )

सर्वांहून तो अति श्रीमंत आहे–[ ही इज रिचेस्ट दॅन ऑल— He is richest than all ] ( सुपर्लेटिव्ह डिग्री )

वरच्या पहिल्या वाक्यांत Rich या विशेषणाचें मूळरूप कायम आहे, म्हणून तें Positive degree चें विशेषण होय; दुसऱ्यांत त्या Rich या विशेषणाला er हा प्रत्यय लागल्यानें इतर कांहींच्यापेक्षां त्याची श्रीमंति अधिक दाखविली आहे, म्हणून तें Richer हें Camparative degree चें विशेषण झालें, आणि तिसऱ्यांत मूळ

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

rich या विशेषणाला est हा प्रत्यय जोडलेला असल्यानें, त्यानें इतर सर्व श्रीमं पेक्षांहि त्याची श्रीमंती अधिक दाखविली आहे, म्हणून तें Superlati degree चें विशेषण झालें आहे.

विशेषणाच्या शेवटीं जर e हा स्वर असेल, तर कम्पॅरेटिव्ह आणि सुपर्लें डिग्रीज् करतांना, अनुक्रमें नुसते r आणि st हे प्रत्यय लावितात. जसें:—

मोठा—( लार्ज ) Large, ( लार्जर ) Larger, Largest

विशेषणाच्या शेवटीं Y असून त्याच्या मागें जर एखादें व्यंजन असेल er व est हे प्रत्यय लागतांना Y च्या जागीं i होतो. जसें:—

सुखी—( हॅपी ) Happy, ( हॅपीयर ) Happier, ( हॅपिए Happiest.

विशेषणाच्या मूलरूपाला er व est हे प्रत्यय लागून विशेषणाचे जे तारतम्य प्रगट होतात, ते फक्त एकावयवी विशेषणालाच जरी बहुश: लागतात, तरी केव्हां ते दोन अवयवांच्या विशेषणांनाहि लागतात. दोन किंवा त्यांहून अधिक अवयवांच्या वि षणांच्याdegrees ( डिग्रीज् ) more ( मोअर ) आणि most ( मोस्ट) शब्द घालून बनतात; जसें:—

| | | |
|---|---|---|
| Wise | More wise | Most wise |
| Pretty | More pretty | Most pretty. |
| Bony | More bony | Most bony |

असें जरी आहे, तरी कांहीं विशेषणांच्या Comparative आणि Sup lative डिग्रीज् अगदींच निराळ्या तऱ्हेनें होतात. जसें:—

| पॉझिटिव्ह डिग्री. | कम्पॅरेटिव्ह डिग्री. | सुपर्लेटिव्ह डि |
|---|---|---|
| पुष्कळ (मेनी-many, मच-much ) | ( मोअर-more ) | ( मोस्ट-most ) |
| लहान ( लिटल-Little ) | ( लेस-Less ) | ( लेस्ट-Lest ) |
| वाईट ( बॅड-Bad ) ,, ( ईव्हल-Evil ) ,, ( इल्-Ill ) | ( वर्स-Worse ) | ( वर्स्ट—Worst ) |

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri



चांगला ( गुड–good ) ( बेटर—Better ) ( बेस्ट—Best )
जुना ( ओल्ड–Old ) } ( ओल्डर—Older ( ओल्डेस्ट—Oldest )
( एल्डर—Elder ) ( एल्डेस्ट—Eldest )

राम हा लक्ष्मणापेक्षां ज्येष्ठ आहे—Rama is elder than Lakshman–राम इज एल्डर दॅन लक्ष्मण ] हीं मराठी व इंग्रजी दोन भाषांतरात्मक वाक्यें एकच आहेत. त्यांतील मराठी वाक्यांत जो पेक्षां हा शब्द मराठींत (दॅन–than) आहे तो मराठी व्याकरणांत शब्दयोगी अव्यय होत असून, इंग्रजी व्याकरणांत त्याचा भाषांतरवाचक जो [ दॅन ] हा शब्द तो उभयान्वयी अव्यय होतो हें ध्यानांत ठेवावें.

सुपरलॅटिव्ह डिग्रीच्या विशेषणामागें the हें नियामक उपपद येऊन पुढें of हें शब्दयोगी अव्यय येतें असा शुद्ध इंग्रजी भाषेचा नियम आहे. जसें—He is the richest of all–ही इज दि रिचेस्ट ऑफ ऑल ) तो सर्वांहून अधिक श्रीमंत आहे.

## शब्दसंग्रह—( व्होकॅब्लरी—Vocabulary )

| | | |
|---|---|---|
| घोड्यावर बसणें | ( टु राइड ) | To Ride. |
| वाघ | ( टायगर ) | Tiger. |
| हत्ति | ( एलिफंट ) | Elephant. |
| उंट | ( कयामल ) | Camel. |
| आरमार | ( नेव्हल ) | Naval. |
| सामर्थ्य | ( पॉवर ) | Power. |
| पृथ्वी | ( दि अर्थ ) | The Earth. |
| जग | ( दि वर्ल्ड ) | The World. |
| देश | ( कन्ट्री ) | Country. |
| लोकसंख्येनें भरलेला | ( पॉप्युलस ) | Populous. |
| अधिक उच्च | ( हायर ) | Higher. |
| उडतो | ( फ्लाइज ) | Flies. |

SRI JAGADGURU VISHWARADHYA
JNANA SIMHASAN JNANAMANDIR
LIBRARY.
Jangamwadi Math, VARANASI.
Acc. No.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

| | | |
|---|---|---|
| चंडोल पक्षी<br>भारद्वाज पक्षी | ( लार्क ) | Lark. |
| सर्वांत मोठा–ठी–ठें | ( ग्रेटेस्ट ) | Greatest. |
| आरमार | ( नेव्हीं ) | Navy. |
| व्यायाम | ( एक्झरसाइज ) | Exercise. |
| सद्गुण | ( व्हर्चु ) | Virtue. |
| कधींकधीं | ( सम्टाइम्स ) | Sometimes. |
| केव्हां–केव्हां | ( ॲट टाइम्स ) | At times. |
| दुर्जन | ( वुइकेड पर्सन ) | Wicked person. |
| नीच | ( दी वुइकेड ) | The wicked. |
| श्रेयस्कर | ( डिझायरेबल ) | Desirable. |
| अधिक जलद | ( सूनर ) | Sooner. |
| सर्वांत अधिक हुषार | ( क्लेव्हरेस्ट ) | Cleverest. |
| धनी | ( मास्टर ) | Master. |
| मालक | ( ओनर ) | Owner. |
| अधिक सुखी | ( हॅपिअर ) | Happier. |
| अत्यंत सुखी | ( हॅपिएस्ट ) | Happiest. |
| सज्जन | ( दि गुड ) | The Good. |
| चांगला माणूस | ( गुड मॅन ) | Good man. |
| अधिक शहाणा | ( वाइझेस्ट ) | Wisest. |
| बरें | ( बेटर ) | Better. |
| वय–वर्ष | ( एज ) | Age. |
| विद्यार्थी | ( स्टूडंट ) | Student. |

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

| | | |
|---|---|---|
| चेला | ( प्यूपिल ) | Pupil. |
| यत्ता | ( स्टॅन्डर्ड ) | Standard. |
| ळी | ( लेन ) | Lane. |
| उपयोगीं | ( यूस्फुल ) | Useful. |
| उपयोगाचा | ( ऑफ यूस ) | Of use. |
| शहाणपण | ( वुइज्डम ) | Wisdom. |
| ौल्यवान् | ( प्रेशियस ) | Precious. |
| अगदीं जवळचा | ( नियरेस्ट ) | Nearest. |
| र्वांत वडील | ( एल्डेस्ट ) | Eldest. |
| किमतीचा | ( कॉस्टली ) | Costly. |
| ळें | ( टँक ) | Tank. |
| रोवर | ( लेक ) | Lake. |
| दी | ( रिव्हर ) | River. |
| लकें | ( लाइट ) | Light. |
| र्णन करणें | ( टु डिस्क्राइब ) | To describe. |
| वेश | ( सीन ) | Scene. |
| खावा | ( शो ) | Show. |
| ष्टी | ( साइट ) | Sight. |
| खावा | ( लॅन्डस्केप ) | Landscape. |
| ल्पना करणें | ( टु इमॅजिन ) | To imagine. |
| र | ( क्रूएल ) | Cruel. |
| पें | ( ईझी ) | Easy. |
| यप्रद | ( फियर्स ) | Fierce. |
| योगी | ( इन्डास्ट्रियस ) | Industrious. |
| स | ( वाइल्ड ) | Wild. |
| शू | ( बीस्ट ) | Beast. |
| काश | ( लाइट ) | Light. |

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

## वाक्यें [ सेन्टेन्सेस--Sentences. ]

ते मुलगे सर्वांत अधिक हुषार आहेत--( दोज बॉईज आर दि क्लेव्हरेस्ट ऑफ ऑल--Those boys are the cleverest of all. )

कधीं कधीं सज्जनांपेक्षां दुर्जन अधिक सुखी असतात--( समटाइम्स दि वि आर हॅपिअर दॅन दि गुड--Sometimes the wicked are happ than the good. )

सॉक्रेटीस हा मोठा तत्वज्ञ आणि शहाणा होता--( सॉक्रेटीस वॉज ए ग्रेट फि सफर ॲन्ड ए वाइज वन--Socratice was a great philosopher a a wise one )

शहाण्याचा चाकर व्हावें पण मूर्खाचा धनी होऊं नये--( वन शुड बी ए स ऑफ ए वाइज,बट नॉट ए मास्टर ऑफ ए फूल--One should be a serv of a wise, but not a master of a fool. )

तो रस्ता आमच्या घराच्या बाजूनें जातो--( दॅट स्ट्रीट गोज बाय दि ऑफ आवर हाऊस-That street goes by the side of our hou

हा रस्ता आमच्या घराला अगदीं जवळचा आहे-( धिस इज ए निअरेस्ट आवर हौस-This is a nearest way to our house. )

माझा सर्वांत वडील मुलगा उपजतांच वारला-( माय एल्डेस्ट सन डाइ हिज बर्थ-My eldest son died at his birth. )

सध्यां मला एकच मुलगा असून, त्याचें वय अवघें बारा वर्षांचें आहे-(प्रेझे आय हॅव ओन्ली वन सन ऑफ ट्वेल्व्ह' इयर्स एजू-Presently I have o one son of twelve years age. )

त्याचा नेहमीं वर्गांत पहिला नंबर असतो-( ही ऑल्वेज स्टॅन्डस् फर्स्ट इ क्लास--He always stands first in the class.)

सर्व व्यायामांत पोहण्यासारखाच घोड्यावर बसण्याचाहि व्यायाम उत्तम आ ( असंग ऑल दि एक्झरसाइजेस् दि रायडिंग इज दि बेस्ट काइन्ड ऑफ एक्झर

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

लाइक स्वीमिंग—Among all the exercises the riding is the best kind of exercises like swimming. )

कांहीं वर्षांपूर्वी जगांत इंग्लंडचें सर्वांत मोठें आरमांरी सामर्थ्य होतें–( सम इयर्स अगो दि ग्रेटेस्ट नेव्हल पॉवर वॉज ऑफ इंग्लंड—Some years ago the greatest naval power was of England. )

जगांत चीन आणि हिंदुस्तान हेच देश लोकसंख्येनें फार मोठे आहेत—( चायना ॲन्ड इंडिया आर दि मोस्ट पॉप्युलस कंट्रींज इन दि वर्ल्ड–China and India are the most populous countries in the world. )

गरुडाइतका उंच आणि वेगानें उडणारा दुसरा पक्षी नाहीं—( देअर इज नॉ अदर बर्ड वुइच वुड फ्लाय हायर ॲन्ड स्विफ्ट दॅन दि ईगल—There is no other bird which would fly higher and swift than the eagle )

सर्व हिंस्र पशूंत वाघच जास्त क्रूर असतो–(दि टायगर इज मोअर फिअर्स दॅन एनी वाइल्ड बीस्ट—The tiger is more fierce than any wild beast. )

ह्याच्या साऱ्या मुलांत दोनच काय ते उद्योगी आहेत–( अमंग ऑल हिज सन्स ओनली टू आर इन्डस्ट्रियस–Among all his sons only two are industrious )

त्या देखाव्याचें वर्णन करण्यापेक्षां कल्पना करणेंहि अवघड आहे–( इट इज ईव्हन डिफिकल्ट टु इम्याजिन दि लॅन्डस्केप दॅन टु डिस्क्राइब–It is even difficult to imagine the landscape than to describe. )

तेलापेक्षां पाणी जड असतें–( वॉटर इज हेवीअर दॅन आईल–water is heavier than oil. )

तळीं, विहिरी, सरोवरें, आणि नद्या यांपेक्षां पावसाचें पाणी स्वच्छ असतें–(रेन-वॉटर इज प्युअर दॅन दि वाटर्स ऑफ टँक्स,,वेल्स, लेक्स ॲन्ड रिव्हर्स-Rain-water is purer than the waters of tanks,wells, lakes and rivers.)

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

तुम्हां दोघांत अधिक सशक्त कोण आहे ?–(हू इज दि स्ट्राँगर अमंग यू बोथ Who is the stronger among you both ? )

मला भातापेक्षां भाकरी आणि भाजी हीं जास्त आवडतात–(आय लाइक बेटर ब्रेड ऍन्ड व्हिजिटेबल दॅन राइस—I like better bread and vegetables than rice. )

माझ्या पुस्तकांपेक्षां त्याचीं पुस्तकें अधिक किमतीचीं आहेत—( हिज बुक्स आर मोअर कॉस्टली दॅन माइन—His books are more costly than mine. )

पुष्कळ तूप विकत घ्यायला पुष्कळ रुपये हवेत—( मेनी रुपीज आर नेसेसरी टु बाय मच घी—Many rupees are necessary to buy much ghee. )

पुरुषांपेक्षां बायका नाजूक असतात—( वुइमेन आर मोअर डेलिकेट दॅन मेन—Women are more delicate than men. )

सद्गुणापेक्षां अधिक श्रेयस्कर कांहींच नाहीं—(नथिंग इज डिझायरेबल दॅन वर्च्यू —Nothing is desirable than virtue. )

चंद्रापेक्षां पृथ्वी मोठी असून, सूर्यापेक्षां ती लहान आहे—( दि अर्थ इज लार्जर दॅन दि मून, ऍन्ड स्मॉलर दॅन दि सन्—The Earth is larger than the Moon, and smaller than the Sun. )

शहाणपणाला मोल नाहीं—( नथिंग इज प्रेशियस दॅन वुइस्डम—Nothing is precious than wisdom. )

## भविष्यत् काळ—(फ्यूचर टेन्स–Future tense.)

इंग्रजी भाषेत–शॅल ( Shall ) आणि–वुइल ( Will ) हीं दोन साहाय्यकारी क्रियापदें असून, त्यांपैकीं कोणचेंहि एक क्रियापदाच्या मूळरूपामागें लाविलें असतां, त्या क्रियापदाचा भविष्यत् काळ तयार होतो. या रीतीप्रमाणें भविष्यत्काळ तयार करतांना उभय वचनीं, तिन्हीं पुरुषीं एकंदर सहा रूपांमध्यें मूळच्या क्रियापदांत मुळींच फरक होत नाहीं. फक्त द्वितीय पुरुषीं एकवचनी साहाय्यकारी क्रियापदांमध्यें मात्र जो फरक होतो तो येणेंप्रमाणें:–शॅल याचें ( Shalt–शॅल्ट ) आणि वुइल याचें (Wilt–वुइल्ट) अशीं रूपें होतात.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

नुसताच भविष्यत् काळ जर दाखवायचा असेल, तर प्रथम पुरुषीं Shall आणि द्वितीय व तृतीय पुरुषीं Will हीं साहाय्यकारी क्रियापदें योजावींत; परंतु कर्त्याच्या मनांत जर—एखादा निश्चय, हेतु किंवा वचन दर्शवावयाचें असेल, तर प्रथम पुरुषीं Will व द्वितीय व तृतीय पुरुषीं Shall हीं साहाय्यकारी क्रियापदें योजावींत.

बसणें—( टु सिट्–To sit. )

| एकवचन. | अनेकवचन. |
| --- | --- |
| मी जाईन ( आय शॅल गो–I shall go. ) | आम्ही जाऊं ( वुई शॅल गो–We shal go. ) |
| तूं जाशील ( यू वुइल गो–You will go. ) | तुम्ही जाल ( यू वुइल गो–You will go. ) |
| तो-ती-तें जाईल ( ही-शी इट वुइल गो–He, she, it will go. ) | ते–त्या–तीं जातील ( दे वुइल गो–They will go. ) |

कांपणें ( टु कट्–To cut. )

| | |
| --- | --- |
| मी कांपीन ( आय शॅल कट–I shall cut. ) | आम्ही कांपूं ( वुइ शॅल कट–We shall cut. ) |
| तूं कांपशील ( दौ वुइल्ट कट–Thou wilt cut. ) | तुम्हीं कांपाल ( यू वुइल कट–You will cut. ) |
| तो-ती-तें कांपील ( ही, शी, इट वुइल कट–He, she, it will cut. ) | ते-त्या-तीं कांपतील ( दे वुइल कट–They will cut. ) |

वर्तमान, भूत आणि भविष्यत् या काळांचे जे बरेच पोटभेद आहेत, त्यांची माहिती करून देण्याच्या आधीं इंग्रजींत जीं साहाय्यकारी क्रियापदें ( ऑक्झिलियरी व्हर्ब्स्–Auxiliary verbs ) आहेत, त्यांची माहिती स्वतःचे स्वतःशीं व नवीन इंग्रजी शिकणारांना आधीं करून देणें इष्ट आहे. याचें कारण असें आहे कीं, त्या तिन्हीं काळांच्या पोटभेदांची माहिती सांगतांना, या साहाय्यकारी क्रियापदांची फार जरूर लागते,



CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

## साह्यकारी क्रियापदें व त्यांचीं तिन्ही काळीं रूपें.

### करणें—( टु डू-To do. )

#### वर्तमान काळ—( प्रेझेन्ट टेन्स-Present tense. )

| एकवचन. | अनेकवचन. |
|---|---|
| मी करतों-( आय डू-I do ). | आम्हीं करतों-( वुइ डू-We do ). |
| तूं करतोस-( दौ डस्ट-Thou dost ). | तुम्ही करतां-( यू डू-You do ). |
| तो, ती, तें-करतो, त्ये, तें-( ही, शी, इट, डझ-He, she, it-does ). | ते, त्या, तीं, करतात—( दे डू-Th do |

#### भूतकाळ —( पास्ट टेन्स-Past tense ).

| | |
|---|---|
| मी केलें-( आय डिड्-I did ). | आम्ही केलें-( वुइ डिड-We did ). |
| तूं केलेंस-( दौ डिस्ट-Thou didst ). | तुम्ही केले-( यू डिड-You did ). |
| त्यानें, तिनें केलें-( ही, शी, इट डिड्— He, she, it did ). | त्यांनीं केलें—( दे डिड—They did ). |

#### भविष्यत् काळ—( फ्यूचर टेन्स-Future tense )

| | |
|---|---|
| मी करीन-( आय शॅल डू-I shall do ). | आम्ही करूं-( वुइ शॅल डू-We sh d |
| तूं करशील-( दौ वुइल्ट डू-Thou wilt do ). | तुम्ही कराल-( यू वुइल डू-You w d |
| तो, ती, तें करील-( ही, शी, इट वुइल डू —He, she, it will do ). | ते, त्या, तीं करतील-( दे वुइल डू-Th will d |

### असणें होणें—[ टु बी—To be ].

#### वर्तमान काळ—[ प्रेझेन्ट टेन्स-Present tense ].

| एकवचन. | अनेकवचन. |
|---|---|
| मी आहे ( आय ॲम-I am ). | आम्ही आहोंत ( वुइ आर-We ar |
| तूं आहेस ( दौ आर्ट-Thou art ). | तुम्ही आहांत ( यू आर-You are |
| तो, ती, तें आहे ( He she it is. ) | ते, त्या, तीं आहेत ( दे आर—Th are |

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

भूतकाळ [ पास्ट टेन्स — Past tense ].

| एकवचन. | अनेकवचन. |
|---|---|
| मी होतों ( आय वॉज्–I was ) | आम्हीं होतों ( वुइ वेअर–We were ) |
| तूं होतास ( दौ वॉस्ट–Thou wast ) | तुम्हीं होतां ( यू वेअर–You were ) |
| तो, ती, तें होता-ती-तें ( ही, शी, इट वॉज–He, she, it was ) | ते, त्या, तीं होते-त्या-तीं ( दे वेअर–They were ). |

भविष्यत् काळ ( फ्यूचर टेन्स—Future tense. )

| एकवचन. | अनेकवचन. |
|---|---|
| मी असेन ( आय शॅल बी -I shall be ) | आम्ही असूं ( वुइ शॅल बी—We shall be ) |
| तूं असशील ( दौ वुइल्ट बी–Thou wilt be ) | तुम्ही असाल ( यू वुइल बी–You will be ) |
| तो, ती, तें असेल ( ही, शी, इट वुइल बी —He, she, it will be ) | ते, त्या, तीं असतील ( दे वुइल बी—They will be. ) |

पाशीं असणें [ टु हॅव—To have ].

वर्तमान काळ [ प्रेझेन्ट टेन्स—Present tense. ]

| एकवचन. | अनेक वचन. |
|---|---|
| माझ्यापाशीं आहे ( आय हॅव–I have ) | आम्हांजवळ आहे ( वुइ हॅव—We have ) |
| तुझ्यापाशीं आहे ( दौ हॅस्ट–Thou hast ) | तुमच्यापाशीं आहे ( यू हॅव—You have ) |
| त्याच्या–तिच्यापाशीं आहे ( ही, शी, इट हॅज -He, she, it has ). | त्यांच्यापाशीं आहे ( दे हॅव—They have ). |

भूतकाळ [ पास्ट टेन्स—Past tense ].

| | |
|---|---|
| माझ्यापाशीं होतें ( आय हॅड–I had ) | आम्हांपाशीं होतें ( वुइ हॅड–We had) |
| तुझ्यापाशीं होतें ( दौ हॅड्स्ट–Thou hadst ) | तुम्हांपाशीं होतें ( यु हॅड–You had ) |

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

त्याच्या, तिच्यापाशीं होतें (ही, शी, इट हॅड–He, she it had) } त्यांच्यापाशीं होतें (दे हॅड—They had).

भविष्यत् काळ [ फ्यूचर टेन्स--Future tense.]

माझ्यापाशीं असेल (आय शॅल हॅव— I shall have) } आम्हांपाशीं असेल (वुइ शॅल हॅव-We shall have)

तुझ्यापाशीं असेल (दौ वुइल्ट हॅव— Thou wilt have) } तुमच्यापाशीं असेल (यू वुइल हॅव-You will have)

त्याच्या, तिच्यापाशीं असेल (ही, शी, इट वुइल हॅव–He, she, it will have) } त्यांच्यापाशीं असेल (दे वुइल हॅव-They will have).

या वर चालवून दाखविलेल्या साहाय्यकारी क्रियापदांव्यतिरिक्त जीं कांहीं आणखी निराळीं साहाय्यकारी क्रियापदें आहेत, तीं येणेंप्रमाणें:—

May (मे,) Must (मस्ठ,) Ought (ऑठ,) Should (शुड,) Would (वुड) आणि Can (कॅन).

May (मे) या साहाय्यकारी क्रियापदाचे एकंदर निरनिराळे असे चार अर्थ होतात. (१) दुसऱ्याचें कल्याण चिंतायचें असल्यास अथवा कोणाला आशीर्वाद देणें असेल तर. जसें:—तुझें कल्याण असो. (मे यु बी हॅपी–May you be happy). (२) त्यानें हातीं घेतलेल्या कामांत त्याची भरभराट होवो. (मे ही बी प्रॉस्परस इन हिज अंडरटेकिंग्ज—May he be prosperous in his undertakings) याचा तिसरा उपयोग Can (कॅन–शकणें) या क्रियापदाप्रमाणें करण्यांत येतो जसें:—(३) मी आंत येऊं (शकूं-Can) का ?–(मे आय कम इन ? May I come in ?) संभव किंवा संशय अर्थीहि याचा चौथ्या तऱ्हेनें उपयोग करण्यांत येतो. जसें:—मला वाटतें आज पाउस पडण्याचा संभव आहे—(आय थिंक इट मे रेन टु डे—I think it may rain to day). May याचा भूतकाळ Might (माइट) असा होतो. जसें—तो गेला असेल—(ही माइट हॅव गॉन—He might have gone.)

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

Must ( मस्ट ) याचा आवश्यकता किंवा जरूरी दाखवायची असेल, तेव्हां उपयोग करतात. जसें:—त्याला पळालेंच पाहिजे–( ही मस्ट रन अथवा मस्ट ही रन). हें साहाय्यकारी क्रियापद तिन्ही काळीं त्याच्या रूपांत फरक न होतां जशाचें तसेंच राहतें. Ought ( ऑट ) याचा आपला जो धर्म म्हणजे कर्तव्यकर्म, त्याअर्थी उपयोग करण्यांत येतो. जसें:–मुलांनीं आपल्या मातापित्यांची आज्ञा पाळणें हा त्यांचा धर्म म्हणजे कर्तव्यकर्म आहे —( चिल्ड्रेन ऑट टु ओबे देअर पेरेन्टस्–Children ought to obey their parents ).

Should ( शुड ) हें shall या क्रियापदाचें भूतकाळचें रूप आहे. याचा जरी Ought या क्रियापदासारखाच उपयोग करण्यांत येतो, तरी या दोहोंच्या अर्थांत जरासा फरक आहे. मी जावें अथवा मी गेलों तर बरें होईल–( आय शुड् गो–I should go ) हें वाक्य पाहा आणि–जाणें हा माझा धर्मच आहे किंवा मला गेलें पाहिजे होतें–( आय ऑट टु गो–I ought to go ) हें वाक्य पहा. या दोन्ही वाक्यांचा अर्थ जवळ जवळ जरी एकच आहे, तरी त्यांत कसा फरक आहे तो ध्यानांत ठेवण्यासारखा आहे.

Would ( वुड ) हें will याचें भूतकाळचें रूप आहे. याचा ' दिलें असतें घेतलें असतें, गेलों असतो, केलें असतें ' वगैरे अर्थी उपयोग होतो.

जसें:—तो गेला असता–( ही वुड गो–He would go ), त्यानें दिलें असतें–( ही वुड गिव्ह—He would give ), तिनें घेतलें असतें–( शी वुड टेक–She would take ) वगैरे.

शब्दसंग्रह—( Voacbulary )

| | | |
|---|---|---|
| विसरणें | ( टु फर्गेट ) | To Forget. |
| विखरणें | ( टु स्प्रेड् ) | „ Spread. |
| राहणें | ( टु रिमेन् ) | „ Remain. |
| निघणें | ( टु स्टार्ट ) | „ Start. |
| जुडणें, जडणें | ( टु कन्स्ट्रक्ट ) | „ Construct. |
| फुकट दवडणें | ( टु वेस्ट ) | „ Waste. |

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

| | | |
|---|---|---|
| पाहिजे | ( रिक्वायर्ड ) | Required |
| बाजू | ( साइड्स ) | Sides |
| जिन्नस | ( आर्टिकल ) | Article |
| स्वाद | ( फ्लेव्हर ) | Flavour |
| परीक्षा, चव | ( टेस्ट ) | Taste |
| प्रत्येक | ( एव्हरी ) | Every |
| आत्मा | ( सोल ) | Soul |
| पायाचा तळवा | ( सोल ) | Sole |
| जोड्याचा तळवा | ( सोल ) | Sole |
| दुसरा, इतर | ( अदर ) | Other |
| सर्वांत मोठा | ( लार्जेस्ट ) | Largest |
| सर्वांत खालचा | ( लोएस्ट ) | Lowest |
| पाहिजे | ( वॉन्ट ) | Want |
| जरूर असणें | ( इन वॉन्ट ऑफ ) | In want of |
| नुकसान | ( डॅमेज ) | Damage |
| हळू | ( जन्टली ) | Gently |
| सावकाश | ( स्लोली ) | Slowly |
| चिठी | ( नोट ) | Note |
| शेवट | ( एन्ड ) | End |
| जेवढें | ( ॲज मच ॲज ) | As much as |
| सांधा | ( जॉइन्ट ) | Joint |
| ,, | ( जंक्शन ) | Junction |
| नख–खें | ( नेल्–स् ) | Nail-s |

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

| | | |
|---|---|---|
| भाग | ( पार्ट ) | Part |
| हिस्सा | ( पोर्शन ) | Portion |
| म्हणतात | ( कॉल्ड ) | Called |
| नांवाचा | ( नेम्ड ) | Named |
| खालचा | ( लोअर ) | Lower |
| दोहोंमध्यें | ( बिट्वीन् ) | Between |
| सांधा, जोड | ( जॉइन्ट ) | Joint |
| वरचा | ( अपर ) | Upper |
| मधला | ( मिडल ) | Middle |
| ही, सुद्धां | ( टू, ईव्हन ) | Too, even |
| गड्डा | ( बंडल ) | Bundle |
| गांठ | ( बेल ) | Bale |
| चांदणें | ( मूनलाइट ) | Moonlight |
| चंद्रप्रकाश | ( ,, ) | ,, |
| कार्यक्रम | ( प्रोग्रॅम ) | Programme |
| क्रमपत्रक | ( ,, ) | ,, |
| अपायकारक | ( इन्ज्यूरियस ) | Injurious |
| आनंदाचें भरतें | ( फ्लड ऑफ जॉय ) | Flood of joy |
| शेत | ( फार्म ) | Farm |
| रणमैदान | ( फील्ड ) | Field |
| शेतकरी | ( फार्मर ) | Farmer |
| रमणीय | ( चार्मिंग ) | Charming |
| शांतता | ( सायलेन्स ) | Silence |

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

| | | |
|---|---|---|
| अधिकारी | ( ऍन ऑफिसर ) | An officer. |
| सरकारी | ( गव्हर्नमेंट ) | Government |
| प्रतिवादी | ( डिफेन्डन्ट ) | Defendent |
| न्यायाधीश | ( जज्ज ) | Judge |
| वकील | ( प्लीडर ) | Pleader. |
| संपला–ली–लें | ( इज ओव्हर ) | Is over. |
| उजेड | ( लाइट ) | Light |
| हळूहळू | ( ग्रॅज्युअली ) | Grgdually. |
| ट्रामचा रस्ता | ( ट्रॅमवे ) | Tramway. |
| आनंद | ( जॉय ) | Joy |
| हर्ष | ( डिलाइट ) | Delight |
| प्रकृति | ( हेल्थ ) | Health |
| च्यामुळें | ( ऑन अकाउन्ट ऑफ ) | On account of |
| " | ( ओइंग टु ) | Owing to |
| ओसाड | ( डेसोलेट ) | Desolate |
| सृष्टि | ( नेचर ) | Nature |
| दुःखी | ( अनहॅपी ) | Unhappy |
| सरशेवटचा | ( लास्ट ) | Last |
| खातें | ( ऍन ऑफिस ) | An office |
| वादी | ( प्लेन्टिफ ) | Plaintiff |
| मुनसफ | ( सबजज्ज ) | Subjudge |
| सरन्यायाधीश | ( चीफजज्ज ) | Chief-Judge |

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

## वाक्यें—( सेन्टेन्सेस–Sentences. )

त्यानें त्याला फार वेळ खोळंबविलें—[ ही डीटेन्ड हिम् फॉर ए लॉंग टाइम—He detained him for a long time. ]

एक तासापेक्षां अधिक वेळ मी त्याची खोटी करणार नाहीं—[ आय शॅल नॉट डिटेन हिम मोअर दॅन ऍन आवर—I shall not detain him more than an hour. ]

अरे, एक तास जरी तुला कांहींच नाहीं, तरी त्याला तो अधिक किंमतीचा आहे—[ ओ, दो ऍन आवर इज नथिंग टु यू, यट इट इज मच व्हॅल्युएबल टु हिम् Oh, though an hour is nothing to you, yet it is much valuable to him. ]

पैशापेक्षां वेळेचें महत्त्व अधिक आहे, हें तुला माहीत नाहीं काय ?—[ डु यू नॉट नो, दॅट टाइम इज मोअर व्हॅल्युएब्ल दॅन मनी ?—Do you not know that time is more valuable than money ? ]

त्या एका तासांत तूं काय केलें असतेंस ?—[ व्हॉट वुड यू हॅव डन् वुइदिन दॅट वन आवर ?—What would you have done within that one hour ? ]

अनेक गोष्टी केल्या असत्या—[ मेनी थिंग्ज वुड हॅव बीन डन्—Many things would have been done. ]

पण अशा कोणच्या अनेक गोष्टी तुला करायच्या आहेत, तें तर सांग आधीं—[ बट टेल मी फर्स्ट, व्हॉट सच अदर मेनी थिंग्ज यू हॅव टु अटेन्ड टु—But tell me first, what such other many things you have to attend to. ]

आम्हीं आपलें नेहमीं काम करीत जावें आणि विश्रांति म्हणून मुळींच घेऊं नये अशी तुमची इच्छा आहेसें दिसतें—[ इट सीम्स सो, दॅट यू वुइश वुइ टु वर्क ऑल्वेज, ऍन्ड नेव्हर टेक रेस्ट—It seems; so, that you wish we to work always and never take rest. ]

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

दिवसांतून चार पांच तास झोंप घ्यावी, सात, आठ तास काम करावें आणि बाकीचा वेळ विश्रांति वगैरेंत घालवावा--[ वन शुड टेक स्लीप डेली फॉर फोर ऑर फाइव्ह आवर्स, शुड बी बिझी फॉर सेव्हन टु एट आवर्स ॲन्ड दि रेस्ट ऑफ दि टाइम शुड बि स्पेन्ट इन टेकिंग रेस्ट एटसेट्रा--One should take sleep daily for four or five hours, should be busy for seven to eight hours and the rest of the time should be spent in taking rest etcetera. ]

तुझें म्हणणें बरोबर आहे--[ यूवर स्पीकिंग इज ट्रू--Your spaking is true. ]

असें जर आहे, तर तूं त्याला विनाकारण दोष कां देतोस हें मला समजत नाहीं-[ इफ् इट इज सो, देन आय डू नॉट नो व्हाय यू शुड ब्लेम हिम--If it is so then I do not know why you should blame him. ]

वेळ फुकट न दवडतां, त्याचा सदुपयोग करावा असें म्हणणें कोण नाकबूल करील ?--[ हू वुइल डिनाय दि स्पीकिंग दॅट इन्स्टेड ऑफ वेस्टिंग टाइम, वन शुड मेक दि बेस्ट यूस ऑफ इट ?--Who will deny the speaking that instead of wasting time, one should make the best use of it ? ]

त्याचें म्हणणें मला नाकबूल आहे, पण माझें त्याला नाहीं--[ आय ॲड्मिट व्हॉट ही सेज, बट ही डज नॉट ॲग्री वुइथ मी--I admit what he says but he does no agree with me. ]

गेली वेळ पुन्हां येत नसते--[ ऑपर्चुनिटि वन्स लॉस्ट नेव्हर रिटर्न्स--Opportunity once lost never returns. ]

आम्हांला वेळ मिळत नाहीं असें आळशी लोक बोलतात--[ आयडल पीपल ओन्ली से, दॅट दे डू नॉट फाइन्ड टाइम--Idle people only say that they do not find time. ]

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

सायंकाळाचा प्रारंभ सूर्यास्ताला होतो.-( ईव्हिनिंग बिगिन्स ॲट दि सन्सेट— Evening begins at the sunset. )

रात्रीं चंद्रप्रकाशानें पृथ्वी खुलते—( दि अर्थ अक्वायर्स फुलनेस ॲट नाइट बाय दि मूनलाइट—The earth acquires fullness at night by the moonlight. )

चंद्राला सूर्यापासून प्रकाश मिळतो, म्हणून तो शीतळ असतो—( दि मून गेट्स् लाइट फ्रॉम दि सन, ऍंड हेन्स शी इज माल्इल्ड-सॉफ्ट कोल्ड—The moon gets light from the sun and hence she is mild soft-cold. )

चांद्रमासाच्या पहिल्या पंधरवड्यांत दररोज चंद्र वृद्धिंगत होत असतो व पंधराव्या दिवशीं पूर्णचंद्र दिसतो.—( दि मून इन्क्रीझेस् डेली इन् दि फर्स्ट फॉर्टनाइट ऑफ दि ल्यूनर मंथ ऍन्ड ऑन दि फिफ्टीन्थ डे फुल मून अपियर्स—The moon increases daily in the first fortnight of the luner-month and on the fifteenth day full moon appears. )

त्या तिथीला पौर्णिमा असें म्हणतात—( दॅट डे इज कॉल्ड पौर्णिमा- That day is called Paurnima. )

पौर्णिमेच्या दुसऱ्या दिवसापासून सौरमासाला प्रारंभ होतो-( फ्रॉम दि नेक्स्ट डे ऑफ पौर्णिमा दि सोलर मंथ बिगिन्स—From the next day of Paurnima the solar month begins. )

सौरमासाच्या पहिल्या पंधरवड्याच्या शेवटच्या दिवसाला अमावास्या म्हणतात- (दि लास्ट डे ऑफ दि फर्स्ट फॉर्टनाइट ऑफ दि सोलर मंथ इज कॉल्ड आमावास्या- The last day of the first fortnight of the solar-month is called Amawasya. )

सूर्यचंद्रांच्या संगमाला म्हणजे त्या दोघांच्या एकाच रेषेंत राहण्याला आमावास्या असें म्हणतात-( दि मीटिंग ऑर जंक्शन ऑफ दि सन ऍन्ड दि मून, दॅट इज् देअर बीइंग इन वन लाइन, इज कॉल्ड अमावास्या-The meeting or junction



CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

of the sun and the moon, that is, their coming in one line is called Amawasya. )

आमावास्येला चंद्रप्रकाश सूर्यप्रकाशांत लोपून जातो, आणि म्हणून चंद्र दिसत नाहीं—( दि मून-लाईट डिमिनिशेस इन दि सनलाइट ऑन दि आमावास्या डे, ऍन्ड सो दि मून डझ नॉट अपिअर—The moonlight diminishes in the sunlight on the Amawasya day, and so the moon does not appear. )

चांदण्यांत फिरायला जाणें हें सर्वांना आवडतें; कारण तें सुखकर वाटतें—( ऑल लाइक टु टेक ए वॉक इन् दि मूनलाइट; बिकॉज् इट् फील्स हॅपियर—All like to take a walk in the moonlight, because it feels happier. )

हे पैसे घेऊन बाजारांत जा आणि चांगला ताजा भाजीपाला घेऊन ये—( टेक धिस मनी, गो टु बझार ऍन्ड ब्रिंग गुड ऍन्ड फ्रेश व्हिजिटेबल—Take this money, go to bazar and bring good and fresh vegetable.)

पण तुला बाजारांत जाऊन चांगला भाजीपाला आणण्याची संवय आहे का?—( बट हॅव यू प्रॅक्टिस ऑफ फेचिंग गुड व्हिजिटेबल इन गोइंग टु मार्केट ?—But have you practice of fetching good vegetable in going to market ? ).

त्या दोघांच्या अंगरख्यांसाठीं कापड आणायचें आहे—( क्लॉथ इज टु बि ब्रॉट फॉर दि कोट्स् ऑफ बोथ ऑफ देम्—Cloth is to be brought for the coats of both of them. )

कापड आणायला गोविंदाहि रामाबरोबर जाईल; कारण त्यालाहि एक अंगरखा पाहिजे आहे—( गोविंदा टू वुइल गो टु फेच क्लॉथ वुइथ रामा, ऍज ही टू वॉन्ट्स् टु हॅव ए कोट—Govinda too will go to fetch cloth with Rama as he too wants to have a coat. )

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

त्याला काळच टोपी विकत घेतली -( ए कॅप हॅज बीन बॉट फॉर हिम् ओन्ली यस्टर्डे-A cap has been bought for him only yesterday. )

मुळजी जेठा मार्केटांतल्या चौथ्या गल्लींत कापडाचें दुकान आहे--( दि क्लॉथ-शॉप इज इन दि फोर्थ लेन ऑफ दि मूळजी जेठा मार्केट--The clothshop is in the fourth lane of the Moolji Jetha market. )

गिरगांवांत ट्रॅममध्यें बसून थेट कुलाब्याला उतर--( सिट इन ट्रॅम ॲट गिरगांव ॲन्ड अलाइट स्ट्रेट ॲट कुलाबा--Sit in tram at Girgaon and alight straight at Colaba. )

व्हेटेरिनरी कॉलेजमध्यें जायला गिरगांवांत परळचें तिकिट काढ--( बाय ए टिकेट फॉर परळ, टु गो टु दि व्हेटेरिनरि कॉलेज--Buy a ticket for Paral, to go to the Veterinary College. )

परळला उतरून तेथें कॉलेजचा पत्ता विचार--( गेट डाऊन ॲट परळ ॲन्ड आस्क देअर दि कॉलेज ॲड्रेस--Get down at Parel and ask there the College address. )

नाक्यावर पोलीसचा शिपाई असतो, तो बरोबर पत्ता सांगेल--( ए पोलीस सेपॉय हू स्टॅन्ड्स् ऑन दि जंक्शन् वुइल टेल् दि करेक्ट ॲड्रेस--A police sepoy who stands on the junction, will tell the correct address. )

मुंबईस कापडाचे व्यापारी फार आहेत--' देअर आर मेनी क्लॉथ-मर्चेन्ट्स् इन बॉंबे--There are many cloth-merchants in Bombay. )

गोविंदराव गाडगिळांचें कापडाचें दुकान मुळजी मार्केटांत कांहीं वर्षांपूर्वी होतें--( देअर वॉज ए क्लॉथ-शॉप ऑफ मि. गोविंदराव गाडगीळ इन मुळजी मार्केट सम इयर्स अगो--There was a cloth-shop of Mr. Govindrao Gadgil in Moolji market some years ago. )

मी देतों ती चिठी घेऊन तेथें जा--( गो देअर टेकिंग दि नोट आय गिव्ह यू-Go there taking the note 1 give you. )

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

ती त्यांना दे आणि ते तुला देतील तें घेऊन ये---( गिव्ह इट टु हिम ॲन्ड ब्रिंग व्हॅट ही गिव्हज् यू---Give it to him and bring what he gives you. )

मला जें हवें आहे तें मी तींत लिहिलें आहे--( आय हॅव रिटन इन इट व्हॉट आय वॉन्ट---I have written in it what I want. )

परत येतांना एक चहाचा डबा आणि दोन रुपयांची साखर घऊन ये. हे रुपये घे ---( ॲट दि टाइम ऑफ कमिंग बॅक ब्रिंग वन टिन ऑफ टी ॲन्ड शुगर ऑफ टु रुपीज् टेक दीज रुपीज्---At the time of coming back bring one tin of tea and sugar of two rupees. Take these rupees. )

हिंवाळा संपल्यानंतर उन्हाळा सुरू होतो---( दि समर बिगिन्स ॲट दि क्लोज ऑफ दि वूइन्टर---The summer begins at the close of the winter.)

उन्हाळ्यांत उष्मा फार होऊन, तहानहि खूप लागते---( दि डेज ऑफ दि समर आर ऑफ वॉर्मथ् ॲन्ड मच् थर्स्ट---The days of the summer are of warmth and much thirst. )

अशा वेळीं शाळा आणि कांहीं सरकारी कचेऱ्यासुद्धां बंद असतात---( ॲट सच टाइम स्कूल्स ॲन्ड ईव्हन सम ऑफ दि गव्हर्नमेंट ऑफिसेस आर क्लोज्ड---At such time school and even some of the Government offices are closed. )

कांहीं सरकारी अधिकारी महाबळेश्वरला व कांहीं उटकमंडला जातात---( सम ऑफ दि गव्हर्नमेन्ट ऑफिसर्स गो टु महाबळेश्वर ॲन्ड सम टु उटकमंड---Some of the Government officers go to Mahabaleshwar and some to Ottakmand. )

उन्हाळ्यासाठीं कांहीं श्रीमंत लोकांनीं आपले बंगले लोणावळ्यास व कांहींनी माथेरानाला बांधले आहेत---( सम ऑफ दि रिच पर्सन्स हॅव बिल्ट देअर बंगलोज ॲट लोणावळा ॲन्ड सम ॲट माथेरान, फॉर समर---Some of the rich persons have built their bungalows at Lonavala and some at Matheran, for summer. )

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

मेच्या सुटींत विद्यार्थी बहुधा आपआपल्या घरीं जातात–( दि स्कूल–बॉईज प्रॉबेब्ली गो टु देअर नेटिव्ह प्लेसेस इन दि व्हेकेशन ऑफ मे–The school-boys probably go to their native places in the vacation of May. )

मोठे दिवस आणि लहान रात्रीं याच ऋतूंत असतात—( लॉंग डेज ऍन्ड शॉर्ट नाइट्स् आर इन धिस सीझन्—Long days and short nights are in this season. )

उन्हाळ्यानंतर पावसाळा येतो—( दि रेनी सीझन कम्स् आफ्टर दि समर—The rainy season comes after the summer. )

पावसाळा हा शेतकऱ्यांचा आपलीं शेतें नांगरण्याचा ऋतु होय—( दि रेनी सीझन इज दि सीझन् ऑफ फार्मर्स टु प्लो देअर फील्डस–The rainy season is the season of farmers to plough their fields. )

या ऋतूंत सृष्टिसौंदर्याचा देखावा मोठा मनोल्हादक असतो—( इन धिस सीझन दि सीन ऑफ दि ब्यूटि ऑफ नेचर इज डिलाइटफुल—In this season the scene of the beauty of nature is delightful. )

जिकडे तिकडे शांतता नांदत असून हिरवें चार गवत दिसतें आहे—एव्हरीव्हेअर सायलेन्स इज प्रिव्हेल्ड ऍन्ड ग्रीन ग्रास इज सीन—Everywhere silence is prevailed and green grass is seen. )

अशा काळीं दुःखी माणसाच्या मनाला जर आनंदाचें भरतें येतें तर सुखी माणसाची गोष्ट काय सांगावी !–(ऍट सच ए टाइम इफ ऍन अनहॅपी इज फ्लडेड वूइथ जॉय देन व्हॉट टु से ऑफ ए हॅपी वन—At such a time if an unhappy man is flooded with joy, then what to say of a happy one.)

आत्मा आणि शरीर असे प्रत्येक मनुष्याचे दोन निरनिराळे भाग असतात–( सोल ऍन्ड बॉडि आर दि टू डिफरन्ट पार्टस् ऑफ मॅन—Soul and body are the two diffierent parts of man. )

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

आम्हीं आपल्या डोळ्यांनीं पाहातों, कानांनीं ऐकतों, नाकानें वास घेतों आणि तोंडानें बोलतों--( वुइ सी वुइथ आवर आईज, हियर वुइथ इयर्स, स्मेल वुइथ नोज ॲन्ड स्पीक वुइथ मौथ---We see with our ·eyes, here with ears, smell with nose and speak with mouth. )

आम्हीं पायांनीं चालतों व हातांनीं काम करतों---( वुइ वॉक वुइथ आवर फीट ॲन्ड वर्क वुइथ हॅन्डस्---We walk with our feet and work with hands. )

ज्यांत मेंदु असतो त्या शरीराच्या सर्वांत उंच भागाला डोकें असें म्हणतात--( दि हाय्येस्ट पार्ट ऑफ दि बॉडि इन वुइच देअर इज ब्रेन, इज कॉल्ड दि हेड--The highest part of the body in which there is brain is called the head. )

मानेच्या खालच्या भागाला छाती म्हणतात---( दि लोअर पार्ट ऑफ दि नेक इज कॉल्ड दि ब्रेस्ट---The lower part of the neck is called the breast. )

कमरेच्या खालीं फुले आणि वर पोट असतें---( दि बटक्स आर डाउन ॲन्ड बेली इज अप दि वेस्ट--The buttocks are down and belly is up the waist. )

दोन डोळ्यांच्यामध्यें नाक असून त्याच्यावरच्या बाजूला कपाळ असतें---(दि नोज बीइंग बिट्विन दि टू आइज्, दि फोरहेड इज ऑन दि अपर साइड ऑफ इट---The nose being between the two eyes, the forehead is on the upper side of it. )

धड आणि डोकें मानेनें जोडलें जातें व जीभेनें चव कळतें---( दि ट्रंक ॲन्ड दि हेड इज जॉइन्ड बाय दि नेक ॲन्ड टेस्ट इज फेल्ट बाय दि टंग---The trunk and head is joined by the neck and test is felt by the tongue. )

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

हातांच्या शेवटीं बोटें आणि मुळांत खांदे असतात--( ऍट दि एन्ड ऑफ दि हॅन्ड्स आर फिंगर्स ऍन्ड ऍट दि रूट आर दि शोल्डर्स--At the end of the hands are fingers and at the root are shoulders. ).

कमरेच्या खालीं मांड्या व तंगड्या असतात--( थाइज् ऍन्ड लेग्ज आर बिलो दि वेस्ट--Thigs and legs are below the waist. )

मांडी व तंगड्या यांच्यामध्यें गुडघा हा त्यांचा सांधा असतो--( बिट्वीन दि थाय ऍन्ड दि लेग दि नी इज देअर जॉइन्ट--Between the thy and the leg the knee is their joint. ).

तंगड्यांच्या शेवटीं पावलें असून त्यांच्या शेवटीं बोटें असतात--( ऍट दि एन्ड्स ऑफ दि लेग्ज देअर आर फीट ऍन्ड ऍट देअर एन्डस देअर आर टोज--At the ends of the legs their are feet and at their ends there are toes. )

---

## क्रियाविशेषणें--( Adverbs-ऍडव्हर्बस. )

क्रियेचा गुण दाखवणारा जो वाक्यांतला शब्द तें क्रियाविशेषण होय. जसें---त्यानें लवकर पुस्तक वाचलें---( ही रेड दि बुक स्विफ्टली---He read the book swiftly. ) या वाक्यांत वाचण्याची ( Read ) क्रिया जलद ( swiftly ) या शब्दानें दाखविली आहे म्हणून, swiftly हें read याचें क्रियाविशेषण झालें.

( २ ) विशेषणाचा गुण दाखविणारा जो वाक्यांतला शब्द तें क्रियाविशेषण होय. जसें---तो अति उच्छृंखल आहे--( ही इज व्हेरी अनरिस्ट्रेंड---He is very unrestrained. ) या वाक्यांत व्हेरी ( अति ) या शब्दानें ( अनरिस्ट्रेन्ड ) या शब्दाचा गुण दाखविला म्हणून very हें क्रियाविशेषण झालें.

( ३ ) वाक्यांतील क्रियाविशेषणाचा गुण दाखविणारा जो शब्द तेंहि क्रियाविशेषणच. जसें:---त्याला फारच वरी बढती मिळाली--( ही गॉट ए मच बेटर प्रमोशन--

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

He got a much better promotion ) या वाक्यांत better ( चांगली ) हें क्रियाविशेषण असतां much ( पुष्कळ ) या शब्दानें त्याचा गुण दाखविला म्हणून much हेंहि क्रियाविशेषणच झालें.

वर दिलेल्या या तिन्ही प्रकारांवरून, इंग्रजींत क्रियाविशेषणाची व्याख्या पुढील-प्रमाणें करतात:—

क्रियेचा, विशेषणाचा व क्रियाविशेषणाचा गुण दाखविणारे जे शब्द तीं क्रियाविशेषणें होत.

या क्रियाविशेषणाच्या ज्या एकंदर सहा जाती आहेत त्या पुढीलप्रमाणें:—

## स्थलवाचक क्रियाविशेषणें.

ऍडव्हर्बस ऑफ प्लेस--( Adverbs of place. )

| | | |
|---|---|---|
| येथें | [ हिअर ] | Here |
| तेथें | [ देअर ] | There |
| जवळ | [ नियर ] | Near |
| येथून | [ हेन्स ] | Hence |
| त्यावर | [ देअरऑन ] | Thereon |
| त्या ठिकाणीं | [ देअर टु ] | There to |
| इकडे | [ हिदर ] | Hither |
| ,, | [ हिदर्वर्ड ] | Hitharward |
| वर | [ अबॅव्ह ] | Above |
| तिकडे | [ थिदर ] | Thither |
| ,, | [ थिदर्वर्ड ] | Thitherward |
| त्या खालीं | [ देअर--अंडर ] | There-under |

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

## ( २ ) कालवाचक क्रियाविशेषणें.

ॲडव्हर्ज ऑफ टाइम--( Adverbs of time. )

| | | |
|---|---|---|
| पासून | ( सिन्स ) | Since |
| लवकर | ( अर्लि ) | Early |
| पूर्वी | ( अगो ) | Ago |
| लवकर | ( सून ) | Soon |
| उद्यां | ( टुमॉरो ) | Tomorrow |
| आतां | ( नौ ) | Now |
| केव्हां | ( व्हेन ) | When |
| पूर्वी | ( बिफोर ) | Before |
| वारंवार | ( ऑफन ) | Often |
| एकदां | ( वन्स ) | Once |
| नेहमीं | ( ऑल्वेज ) | Always |
| जेव्हां | ( व्हेन ) | When |
| नंतर | ( दन ) | Then |
| ,, | ( आफ्टर ) | After |

## (३) रीतिवाचक क्रियाविशेषणें.

ॲडव्हर्ज ऑफ मॅनर—( Adverbs of manner. )

| | | |
|---|---|---|
| वाईट | ( बॅडली ) | Badly |
| अशा प्रकारें | ( दस् ) | Thus |
| असा, इतका | ( सो ) | So |
| मंद | ( स्लोली ) | Slowly |
| चांगला | ( गुड्ली ) | Goodly |
| खचीत | ( सर्टन्ली ) | Certainly |
| चांगला | ( वेल ) | Well |
| घाईचा | ( हेस्टी ) | Hasty |

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

## ( ४ ) परिणामवाचक क्रियाविशेषणें.

ॲडव्हर्ब्ज ऑफ डिग्री—( Adverbs of degree. )

| | | |
|---|---|---|
| फार | ( टू ) | Too |
| फार | ( व्हेरी ) | Very: |
| क्वचित् | ( हार्डलि ) | Hardly: |
| अगदीं | ( क्वाइट ) | Quite |
| पुष्कळ | ( मच ) | Much |
| थोडें | ( लिट्ल् ) | Little |
| बहुतेक | ( ऑल्मोस्ट ) | Almost |
| कांहीं अंशीं | ( समव्हॉट ) | Somewhat |

## ( ५ ) कारणवाचक क्रियाविशेषणें.

ॲडव्हर्ब्ज ऑफ कॉज्—( Adverbs of cause. )

| | | |
|---|---|---|
| त्याप्रमाणें | ( अकॉर्डिंगली ) | Accordingly |
| जेणें करून | ( व्हेअरबाय ) | Whereby |
| कां | ( व्हाय ) | Why |
| म्हणून | ( देअरफर ) | Therefore |

## ( ६ ) निश्चयार्थी किंवा निषेधार्थी क्रियाविशेषणें.

ॲडव्हर्ब्ज ऑफ निगेशन—( Adverbs of negation. )

| | | |
|---|---|---|
| नाहीं | ( नो ) | No |
| इतकेंच नव्हे | ( ने ) | Nay |
| नाहीं | ( नॉट ) | Not |
| कधीं नाहीं | ( नेव्हर ) | Never |
| खरोखर | ( इंन्डीड ) | Indeed |
| होय | ( यस् ) | Yes |

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

काहीं विशेषणांना ly हा प्रत्यय लाविला असतां त्यांचीं क्रियाविशेषणें कशीं सिद्ध होतात तें पहा:—

Begger + ly = Beggarly. Pauper + ly = Pauperly.
Poor + ly = Poorly. Rich + ly = Richly.
Common + ly = Commonly. High + ly = Highly.

काहीं शब्द क्रियाविशेषणें आणि शब्दयोगी अव्ययें अशीं दोन्ही होतात. तीं ओळखण्याची खूण अशी आहे कीं, त्या शब्दांचा जर वाक्यांत नामांशीं किंवा सर्वनामांशीं संबंध येत असेल, तर ते शब्द शब्दयोगी अव्ययें आहेत असें समजावें आणि स्वतंत्र असतील तर तीं क्रियाविशेषणें आहेत असें जाणावें. जसें:—

वर काहीं तरी आहे-( देअर इज समथिंग अपवर्ड There is something upward ) या वाक्यांत Upward ( वर ) हा शब्द स्वतंत्र असल्यानें तो येथें क्रियाविशेषणात्मक आहे; परंतु त्याच्यांत जर—वर आकाशांत काहीं तरी आहे, (देअर इज समथिंग अपवर्ड इन दि स्काय ) असा फरक करून तेंच वाक्य केलें तर upward ( वर ) या शब्दाचा संबंध sky ( आकाश ) या शब्दाशीं येत असल्यानें तोच upward हा शब्द लगेच शब्दयोगी अव्यय बनला. याचप्रमाणें—तो जवळ उभा होता—( ही वॉज स्टँडिंग नियर—He was standing near ) आणि तो खुर्चीजवळ उभा होता—( ही वॉज स्टँडिंग नियर ए चेअर—He was standing near a chair. ) या वरील दोन वाक्यांपैकीं पहिल्या वाक्यांतील near हा शब्द स्वतंत्र असल्यानें तो क्रियाविशेषण झाला व दुसऱ्या वाक्यांतील near या शब्दाचा संबंध chair ( खुर्ची ) या शब्दाशीं येत असल्यानें तो शब्दयोगी अव्यय बनला.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

## शब्दसंग्रह—( Vocabulary. )

| | |
|---|---|
| दोष देणें–( टु ब्लेम ) To blame. | दोष दिला–( ब्लेम्ड ) Blamed. |
| पकडणें–( टु कॅच ) To catch. | पकडला–( कॉट ) Caught. |
| ऐकणें–( टु लिसन ) To listen. | ऐकलें–( लिसन्ड टु ) Listened to. |
| बिथरणें–( टु बि मॅड ) To be mad. | बिथरलेला–( मॅडन्ड ) Maddened. |
| पसरणें–( टु स्कॅटर ) To scatter. | पसरलेला–( स्कॅटर्ड ) Scattered. |
| जाणें–( टु पास ) To pass. | गेलेला–( पास्ड ) Passed. |
| मागें सरणें–(टु वुइड्रॉ)To withdraw. | मागें सरलेला–( वुइड्रॉन ) With-drawn. |
| घट्ट बसवणें–( टु फिक्स ) To fix. | घट्ट बसवलेला–( फिक्स्ड ) Fixed. |
| चोंची मारणें ( टु पेक अप ) To peck up. | चोंची मारलेला–( पेक्ड अप ) Pecked up. |
| खालीं येणें–( टु फ्लो डाउन ) To flow down. | खालीं आलेला–( फ्लोड डाउन ) Flow-ed down. |
| गिळणें–( टु स्वॉलो ) To swallow. | गिळलेला–( स्वालोड ) Swallowed. |
| आरंभणें–( टु बिगिन् ) To begin. | आरंभलेला–( बिगन ) Begun. |
| एकत्र करणें–(टु युनाइट) To unite. | एकत्र केलेला–( युनायटेड ) United. |
| उडी मारणें–( टु स्प्रिंग ) To spring. | उडी मारली–( स्प्रॅंग ) Sprang. |
| वागणें–( टु ऍक्ट ) To act. | वागला-ली-लें–( ऍक्टेड ) Acted. |
| आशा धरणें–( टु होप ) To hope. | आशा धरली–( होप्ड ) Hoped. |
| हरविणें–( टु लूज ) To lose. | हारविलेला–( लॉस्ट ) Lost. |
| कुरतुडणें–( टु निबल ) To nibble. | कुरतुडलेला–( निबल्ड ) Nibbled |
| परवानगी देणें–( टु अलौ ) To allow. | परवानगी दिलेला–( अलौड ) Allowed. |
| मोकळें सोडणें–( टु सेट फ्री ) To set free. | एकी–( युनिअन ) Union. |
| काड्या–( ब्लेड्स् ) Blades. | ओलें गवत–( ग्रास ) Grass. |

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

ही, सुद्धां–( इंव्हन ) Even
दृष्टी–( साइट ) Sight
उडी–( स्प्रिंग ) Spring
„–( लीप ) Leap
नियमित–( सर्टन ) Certain
पातळ, बारीक–( थिन ) Thin
मित्र–( फ्रेन्ड ) Friend
बाळमित्र–( मेट ) Mate
जुना मित्र–( चम ) Chum
पुढील प्रमाणें–( अकॉर्डिंग टु दि फॉलोइंग ) According to the following
घट्ट धरणें–( टु होल्ड फास्ट ) To hold fast
उंट–( कॅमल ) Camel
मधून–( थ्रू ) Through
तांदुळाचें दाणें–(राइसग्रेन ) Ricegrain
भूक–( हंगर ) Hunger
भुकेलेला–( हंग्री ) Hungry
क्षणांत–( इन ए मोमेंट ) In a moment
अदूरदर्शी–( इम्प्रूडन्ट ) Imprudent
दूरदर्शी–( प्रूडन्ड ) Prudent
हालचाली–( मुव्हमेंटस )Movements
आपमतलबी–( कन्सीटेड ) Conceited
एकांत–( लोन्ली ) Lonely

वाळलेलें गवत–( हे ) Hay
पहिल्या प्रथम–( ऍट फर्स्ट ) At first
उडी मारणें–( टु लीप ) To leap
जमीन–( अर्थ ) Earth.
„ –( ग्राउन्ड ) Ground
तृप्त होणें–( टु सॅटिस्फाय ) To satisfy
„ ( करणें )–( „ „ ) „
पुढील प्रमाणें–( ऍज फॉलोज ) As follows
कोणी एक–( सर्टन ) Certain
दोरी–( रोप ) Rope
पारधी–( फौलर ) Fowler
अंतर–( डिस्टन्स ) Distance
हत्ती–( एलिफंट ) Elephant
अकस्मात् ( बाय चॅन्स ) By chance
जाळें–( नेट ) Net
बळकट–( स्ट्रॉंग ) Strong
उपदेश–( ऍडव्हाइस ) .
एकदम–( सडन्ली ) Suddenly
क्षणांत–( ऍट वन मोमेंट ) At one moment
अविचारी–( रॅश ) Rash
दाणें–( ग्रेन्स ) Grains
सावध–( कॉशस ) Cautious
जागा–( प्लेस ) Place
प्रश्न–( क्वश्चन ) Question

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

## वाक्यें ( सेन्टेन्सेस—Sentences ).

आपल्या जाळ्यांत पक्षी पकडण्यासाठीं, एका पारध्यानें आपलें जाळें पसरलें व तो दूर जाऊन उभा राहिला ( इन ऑर्डर टु कॅच दि बर्ड्स, ए फौलर स्प्रेड हिज नेट ॲन्ड वुइथड्रयू टु ए लाँग डिस्टन्स—Inorder to catch the birds a fowler spread his net and withdrew to a long distance. )

त्याच वेळीं कांहीं पक्षी अकस्मात् आकाशांतून उडत चालले होते-( एट दि व्हेरी टाइम सम् बर्डस वेअर फ्लाइंग बाय चॅन्स इन दि स्काय—At the very time some birds were flying by chance in the sky. )

पारध्यानें जाळ्याजवळ पसरलेलें धान्य पक्ष्यांच्या नजरेस पडलें-( दि बर्डस कॉट साइट ऑफ दि ग्रेन, स्प्रेड बाय दि फौलर नियर दि नेट—The birds caught sight of the grain spread by the fowler near the net.)

उडत असलेल्या पक्ष्यांतील एकानें पुढीलप्रमाणें आपल्या बाळमित्राला प्रश्न केला-( वन ऑफ दि फ्लाइंग बर्डस पुट ए क्वश्चन टु इटस मेट अॅज फॉलोज-One of the flying birds put a question to its mate as follows.)

या अशा ओसाड आणि एकांत जागेंत हें धान्य कसें बरें आलें असावें?-( हौ धिस ग्रेन मस्ट हॅव कम ॲट सच ए डेसोलेट ॲन्ड लोन्ली प्लेस ?-How this grain must have come at such a desolate and lonely place ? )

पाहूं या तर खरें जाऊन काय आहे तें-( लेट अस गो ॲन्ड फाइन्ड आउट दि ट्रुथ-Let us go and find out the truth. )

तरी पण आपण आपल्या हालचालींत आपल्याला फार सावधपणा राखला पाहिजे—( यट वुइ मस्ट कीप आवर्सेल्व्हज कॉशस इन आवर मुव्हमेन्टस—Yet we must keep ourselves very cautious in our movements.)

त्या पक्ष्यांतील एका आपमतलबी पक्ष्यानें आपल्या इतर सर्व गड्यांना फारच खोटा उपदेश केला-( वन कन्सीटेड बर्ड अमंग दि अदर्स गेव्ह ए व्हेरी फॉल्स ॲडव्हाइस टु इटस फ्रेन्डस-One conceited bird among the others gave a very false advice to its friends. )

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

त्याच्या त्या उपदेशानें सारे पक्षी खालीं उतरले-( हिअरिंग दॅट ऍड्व्हाइस ऑफ इट ऑल दि बर्ड्स फ्ल्यू डौन—Hearing that advice of it all the birds flew down. )

नंतर ते पक्षी आपल्या चोंचिनें दाणे टिपून खाऊं लागले-( देन दोज बर्ड्स बिगॅन टु पेक अप दि ग्रेन ऍन्ड स्वॉलो–Then those birds began to peck up the grain and swallow. )

त्यांनीं दाणे टिपायला आरंभ करतांक्षणींच ते सारे जाळ्यांत अडकले गेले-(ऍज सून ऍज दे बिगॅन टु पेक अप दि ग्रेन, ऑल ऑफ देम वेअर कॉट इन दि नेट—As soon as they began to peck up the grain, all of then were caught in the net. )

आपल्या मित्राच्या अविचाराबद्दल, ते मग त्याला दोष देऊं लागले-( दे देन बिगॅन टु फाइन्ड फॉल्ट वुइथ दि इम्प्रूडन्स ऑफ देअर फ्रेन्ड—They then began to find fault with the imprudance of their friend. )

पण ती त्यांची स्वतःचीच चूक होती-( बट इट वॉज देअर ओन मिस्टेक–But it was their own mistake. )

त्यांनीं त्याचें ऐकलें नसतें, तर ते संकटांत पडले नसते-( इफ दे वुड नॉट हॅव लिसन्ड हिम, दे वुड नॉट हॅव बिफॉलन इन्टु मिझरी–If they would not have listened him, they would not have befallen into misery. )

त्यांनीं त्याबद्दल स्वतःलाच दोष द्यायला हवा होता-( दे ऑट रादर टु हॅव ब्लेम्ड देमसेल्व्हज फॉर इट–They ought rather to have blamed themselves for it. )

त्यांतल्या एका शहाण्या पक्ष्यानें नंतर एक युक्ति सुचवली—( वन ऑफ दि वाइज बर्ड्स देन प्रपोज्ड ए ट्रिक—One of the wise birds then proposed a trick. )

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

त्यानें संघशक्तीच्या बळानें एकदम सर्वांनीं उडावें असें सांगितलें—( ही टोल्ड टु फ्लाय ऑल ॲट वन्स वुइथ दि यूनियन स्ट्रेंग्थ ऑर स्ट्रेंग्थ ऑफ युनिटि—He told to fly all at once with the union strength, or strength of unity. )

त्याप्रमाणें त्या सर्वांनीं आपली शक्ति एकवटली व ते जाळ्यासह तत्क्षणीं दूर उडून गेले—( अकॉर्डिंगली ऑल ऑफ देम, ऑन दि स्ट्रेंग्थ ऑफ युनियन फ्लेड अवे इन्स्टन्टेनियस्ली ॲट लाँग डिस्टन्स वुइथ दि वेब—Accordingly all of them on the strength of union fled away instantaniously at a long distance with the web. )

वस्तु स्वतंत्रपणें भक्कम नसतांही, त्या जर एकत्र केल्या तर त्यांची शक्ति वाढते-( दो दि थिंग्ज आर नॉट स्ट्रॉंग सेपरेटली, यट दे बाय बीइंग युनायटेड, गेट देमसेल्व्हज स्ट्रॉंग—Though the things are not strong seperately, yet they by being united, get themselves strong. )

गवताच्या बारिक काड्यांच्या बनविलेल्या दोरानेंहि चिथरलेल्या हत्तीला ताळ्यावर आणतां येतें—( ईव्हन ए मॅड एलिफंट कॅन बी हेल्ड फास्ट बाय ए रोप मेड ऑफ थिन ब्लेडस ऑफ ग्रास—Even a mad elephant can be held fast, by a rope made of thin blades of grass. )

पक्ष्यांनीं हाच कित्ता गिरविला—( दि बर्ड्स फॉलोड दि सेम इलस्ट्रेशन—The birds followed the same illustration. )

ते परत जमिनीवर येतील अशी पारध्याला आशा होती—( दि फौलर होप्ड दॅट दे वुड कम डाउन अगेन टु दि अर्थ—The fowler hoped that they would come down again to the earth.)

पण व्यर्थ ! ते जाळ्यासह दृष्टीआड झाले—( बट इनव्हेन ! दे पास्ट आउट ऑफ साइट वुइथ दि नेट—But invain ! They passed out of sight with the net. )

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

याप्रमाणें पारधी आपल्या जाळ्यासह पक्ष्यांना आंचवला—[ धिस वे दि फौलर लॉस्ट हिज नेट वूइथ दि बर्ड्स—This way the fowler lost his net with the birds. ]

नंतर ते सर्व पक्षी त्या जाळ्यासह एका उंदराच्या बिळापाशीं गेले —[ देन ऑल दि बर्ड्स वूइथ दॅट नेट वेंट टु दि होल ऑफ ए माउस—Then all the birds with that net went to the hole of a mouse. ]

उंदरानें तें जाळें कुरतडून पक्ष्यांना खुलें केलें—[ दि माउस सेट फ्री दि बर्ड्स बाय निब्लिंग दि नेट—The mouse set free the birds by nibling the net. ]

एकीचें बळ असें विलक्षण असतें—[ सच इज दि वंडरफुल स्ट्रेंग्थ ऑफ युनियन —Such is the wonderful strength of union. ]

---

## शब्दयोगी अव्यय—[ प्रेपोझिशन—Preposition. ]

वाक्यांतील इतर शब्दांशीं संबंध दाखविण्यासाठीं नामाचा किंवा सर्वनामाचा जो शब्द योजितात, त्याला शब्दयोगी अव्यय असें म्हणतात. जसें—तो दागीना पेटींत आहे-[ दि ऑर्नमेंट इज इन दि बॉक्स—The ornament is in the box. ] या वाक्यांत दागिना [ ornament ] आणि पेटी [ box ] या दोन्ही शब्दांचा संबंध in या शब्दानें दाखविला आहे, यास्तव in हे शब्दयोगी अव्यय आहे. याच अन्वयें- ते कुत्र्याबरोबर धांवले-[ दे ऱ्यान वुइथ दि डॉग–They ran with the dog ] यांतील with हें शब्दयोगी अव्यय झालें.

ज्या नामाला किंवा सर्वनामाला [ प्रेपोझिशन ] शब्दयोगी अव्यय लागतें, त्याची नेहमीं द्वितीया विभक्ति—[ ऑब्जेक्टिव्ह केस ] असतें, ही गोष्ट मागें विभक्ति या प्रकरणांत सांगितलेलीच आहे.



CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

( शब्दसंग्रह—Vocabulary )

| | | |
|---|---|---|
| आंत | ( इन ) | In |
| उजाडतांच | ( ॲट डे-ब्रेक ) | At day break |
| करितां-साठीं | ( फॉर ) | For |
| कामधंदा | ( बिझिनेस ) | Business |
| खोगीर | ( सॅडल ) | Saddle |
| गैरहजर | ( ॲब्सेन्ट ) | Absent |
| गलबत | ( शिप ) | Ship |
| चा—ची—चें | ( ऑफ ) | Of |
| जवळ | ( नियर, ॲट हॅन्ड ) | Near, at hand |
| गोंगाट | ( नॉईज ) | Noise |
| दरवाजा | ( डोअर ) | Door |
| पोहोंचणें | ( टु अराइव्ह ) | To arrive |
| सुख | ( प्लेझर ) | Pleasure |
| संपविलें | ( फिनिश्ड ) | Finished |
| नदीचा तीर | ( बॅन्क ) | Bank |
| सहनशक्ति | ( एन्डयुअरन्स ) | Endurance |
| किनारा | ( शोअर ) | Shore |
| आशा करणें | ( टु एक्स्पेक्ट ) | To expect |
| उशीरां | ( लेट ) | Late |
| कडे | ( ॲट ) | At |
| खालीं | ( डौन ) | Down |
| ,, | ( अंडर ) | Under |
| ,, | ( बिलो ) | Below |
| ,, | ( बिनीथ ) | Beneath |
| ,, | ( अंडरनीथ ) | Underneath |
| आरंभ केला | ( कमेन्सड ) | Commenced |
| प्रकाशीत होतो | ( शाइन्स ) | Shines |
| परत आला | ( रिटर्न्ड ) | Returned |

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

| | | |
|---|---|---|
| पोहोंचला | ( अराइव्हड ) | Arrived |
| लाटा | ( वेव्हज ) | Waves |
| नदी | ( रिव्हर ) | River |
| संकट | ( डेन्जर ) | Danger |
| स्वभाव | ( टेम्पर ) | Temper |
| बांधलेली | ( टाइड ) | Tied |
| भांडण | ( क्वारळ ) | Quarrel |
| तरंगणें | ( टु फ्लोट ) | To float |
| विषयीं | ( अबाउट ) | About |
| आंत | ( इन्टू ) | Into |
| पूर्वी | ( बिफोर ) | Before |
| ,, | ( ॲगो ) | Ago |
| जवळ | ( बिसाइड ) | Beside |
| शिवाय | ( वुइदाउट ) | Without |
| मध्यें | ( ड्यूरिंग ) | During |
| विरुद्ध | ( अगेन्स्ट ) | Against |
| नंतर | [ आफ्टर ] | After |
| पासून | [ फ्रॉम ] | From |
| भांडले | [ क्वारल्ड ] | Quarreled |
| तरंगले | [ फ्लोटेड ] | Floated |
| वर | [ ऑन ] | On |
| ,, | [ अपॉन ] | Upon |
| पूर्वी | [ बिफोर ] | Before |
| सभोंवतीं | ( अराउन्ड ) | Around |
| ने-ए-शीं | ( बाय ) | By |
| पर्यंत | ( टिळ ) | Till |
| शिवाय | ( एक्सेप्ट ) | Except |
| मध्यें | ( बिटवीन ) | Between |
| ,, | ( अमंग ) | Among |
| पलीकडे | ( बियॉन्ड ) | Beyond |

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

## वाक्यें-[ सेन्टेन्सेस-Sentences ].

ते घरीं नाहींत, तुम्ही त्या खुर्चीवर बसा-( दे आर नॉट ऍट होम, यू शुड सिट इन् दॅट चेअर-They are not home, you should sit in that chair. )

माझ्याजवळ तो बाकावर बसला-( ही सॅट बाय मी ऑन दि बेन्च—He sat by me on the bench. )

त्याच्याशीं कोणीही बोलूं नका; आज तो रागावलेला आहे—( नन् शुड स्पीक वुइथ हिम; टु-डे ही इज इन ए बॅड टेंपर-None should speak with him To-day he is in a bad temper. )

थांबा! उगाच गोंगाट करणें बरें नव्हे-(स्टॉप ! इट् इज् नॉट गुड् टु मेक नॉइज् यूस्लेस्ली-Stop! It is not good to make noise uselessly.)

कारण तो असह्नीय असतो—( बिकॉज इट् इज् बियॉन्ड एन्डयुअरन्स—Because, it is beyond endurance. )

त्यानें अनेक संकटें सोसलीं आहेत-( ही हॅज पास्ड थ्रू मेनी डेन्जर्स-He has passed through many dangers. )

तुम्ही ज्या ज्या ठिकाणीं जाल त्या त्या ठिकाणीं तो तुमच्याबरोबर येत जाईल-( ही वुइल अकम्पनी यू व्हेअरयेव्हर यू वुइल गो-He will accompany you where-ever you will go. )

वर स्वर्ग आणि खालीं नरक आहे-( दि हेवन इज अप ऍन्ड डाऊन इज हेल्-The heaven is up and down is hell. )

वर आकाशांत आमच्या डोक्यावर पक्षी उडतात—( अप् इन दि स्काय ओव्हर आवर हेडस् दी बर्डस फ्लाय—Up in the sky over our heads the birds fly. )

आमच्या पायांखालीं जमीन असून डोक्यावर आभाळ आहे—दि अर्थ इज अन्डर आवर फीट ऍन्ड दि स्काय इज अबव्ह अवर हेड्स्-The earth is under our feet and the sky is above our heads. )

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

तो कुत्रा तुमचा आज्ञाधारक नोकर आहे—(दॅट डॉग इज युवर ओबीडिअन्ट सर्व्हन्ट—That dog is your obedient servant.)

जो मनुष्य दरवाज्याबाहेर उभा आहे, तो तुमची भेट घेऊं इच्छितो आहे—(दि मॅन हू इज स्टॅन्डिंग वुइदाउट दि डोअर, वुइशेस टु सी यु—The man who is standing without the door, wishes to see you.)

अकराशें पानांचें पुस्तक मला अवघ्या तीन रुपयांस मिळालें—(आय गॉट ए बुक ऑफ इलेव्हन हन्ड्रेड लीव्हज्, ओन्ली फार रुपीज थ्री—I got a book of eleven hundred leaves only for rupees three.)

आम्ही आतां भयापासून मुक्त आहोंत—(नौ वुइ आर औट ऑफ डेन्जर—Now we are out of danger.)

तो आपल्या स्वतःच्या घोड्यावरून पडणें शक्यच नाहीं—(इट् इज् नॉट पॉसिबल फार हिम् टु फॉल ऑफ हिज् ओन हॉर्स—It is not possible for him to fall of his own horse.)

तो बरोबर दहा वाजतां घरून कचेरीला जायला निघतो—(ही लीव्हज् होम टु गो आबाउट हिज् ऑफिस एक्झॅक्ट्ली ऍट टेन—He leaves home to go about his office exactly at ten.)

या जागेजवळ ये आणि येथें ताठ उभा राहा—कम नियर धिस स्पॉट ऍन्ड स्टॅन्ड हियर स्ट्रेट—Come near this spot and stand here strate.)

वादळाच्या ऋतूंत गलबतें नेहमीं किनाऱ्याला बांधून ठेवतात—(इन स्टॉर्मी सीझन दि शिप्स आर ऑल्वेज टाइड अलॉंग दि शोअर—In stormy season the ships are always tied along the shore.)

ते आपसांत भांडले आणि अदालतीची पायरी चढले—(दे क्वारल्ड अमंग दमसेल्व्हज् ऍन्ड बिकेम स्लेव्हज टु लॉ—They quarreled among themselves and became slaves to law.)

नदीच्या प्रवाहावर कित्येक गलबतें तरंगत होतीं—(मेनी शिप्स वेअर फ्लोटिंग ऑन् दि वॉटर-करंट ऑफ ए रिव्हर—Many ships were floating on the water-current of a river.)

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

माकडें फळें खाण्यासाठीं या झाडावरून त्या झाडावर उड्या मारीत होतीं--(मं-कीज् वेअर लीपिंग फ्रॉम वन ट्री टु अदर फॉर ईटिंग फ्रूट--Monkeys were leaping from one tree to other for eating fruit.)

तो त्याच्या शेजारीं दरवाज्यांत उभा होता--(ही वॉज स्टॅन्डिंग इन दि डोअर बाय हिज् साइड--He was standing in the dcor by his side.)

त्यानें ज्या दिवसापासून हें काम सुरू केलें, त्या दिवसापासून एक महिन्यांत हें काम घरीं राहून पुरें केलें--(ही फिनिश्ड दि वर्क इन ए मन्थ, स्टेइंग ॲट होम, फ्रॉम दि डे ही कमेन्स्ड वुइथ इट--He finished the work in a month, staying at home, from the day he commenced witn it.)

त्याची चाळीशी उलटून, तो जरी पन्नाशीच्या घरांत आहे, तरी अजून वाचा-लिहायला चष्मा लावीत नाहीं--(दो ही हॅज पास्ड फॉर्टि ॲन्ड वुइदिन दि एज ऑफ फिफ्टी, यट डझ नॉट यूस स्पेक्टिकल्स--Though he has passed foty, and within the age of fifty, yet does not use spectacles)

येत्या सोमवारीं मी तुझी दोन तास वाट पाहीन, आणि नंतर पर्वतीला जाईन--(आय शॅल बि वेटिंग फॉर यू ऑन कमिंग मन्डे फॉर टू ऑवर्स, एंन्ड देन आय शॅल स्टार्ट फॉर पर्वती--I shall be waiting for you on coming monday for two hours, and then I shall start for Parvati.)

सूर्य सकाळीं उगवून सायंकाळीं अस्ताला जातो आणि चंद्र सायंकाळीं उदय पावून पाहाटे मावळतो-(दि सन रायझेस इन दि मॉर्निंग एॅन्ड सेट्स् इन् दि ईव्हि-निंग, व्हाइल दि मून कम्स अप इन् दि इव्हिनिंग एॅन्ड फेड्स् ॲट दि सन-राइज--The sun rises in the morning and sets in the evening while the moon comes up in the evening and fades at the sun-rise.)

तो महिन्यांतून एकोणतीस दिवस गैर हजर असतो--(ही एब्सेन्टस् हिम्सेल्फ फॉर ट्वेन्टीनाइन डेज् इन ए मन्थ-He absents himself for twenty nine days in a month.)

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

## उभयान्वयी अव्यय—( कंजंक्शन–Conjuction )

हर्ष, शोक, चमत्कार, आश्चर्य, दुःख, आनंद वगैरे वगैरे मनोविकार दाखविणारा जो शब्द त्याला केवलप्रयोगी अव्यय म्हणावें. त्याचा संबंध वाक्यांतील कोणत्याही शब्दांशीं येत नाहीं, जसें:—

ओ ( O ), Ah ( ॲं ), लो ( Lo ), अलास ( Alas ), हुरा ( Hurrah ), हुश् (Hush) वगैरे शब्द हीं केवलप्रयोगी अव्ययें (इन्टरजेक्शन्स् Interjections ) होत.

### शब्दसंग्रह—( Vocabulary ).

मरण–( डेथ् ) Death.
निकट–( क्लोजली ) Closely.
कमी करणें–( टु लेसन् ) To lessen.
,, ( टु रिड्यूस ) To reduce.
पाऊल–( स्टेप् ) Stop.
शिडी–( लॅडर ) Ladder.
भक्ष्य–( प्रे ) Prey.
चुकला– मिस्ड् ) Missed
पट्टा– ( स्ट्राइप ) Stripe.
शींसंबंध असलेला–( टु बी अलाइड बुइथ–To be allied with )
स्थिति ( स्टेट ) State.
जड–( हेवी ) Heavy.
भाषा–( लँग्वेज् ) Language.
दुष्ट–( क्रूएल ) Cruel.
जिना–( स्टेअर केस ) Stare case.
सोपें–( ईझी ) Easy.
उपासमार–( स्टार्व्हेशन ) Starvation
खूण केलेला–( मार्क्ड् ) Marked.
काळाभोर– ( रिच् डार्क ) Rich dark
काळाकाभिन्न–( डीप ब्लॅक ) Deep black.

| | | |
|---|---|---|
| सुरंग | ( चेस्टनट ) | Chestnut |
| तेल्याकुमाइत | ( आयर्न ग्रे ) | Iron gray |
| अबलक-ख | ( पी—बॉल्ड ) | Pie bald |
| हिम | ( स्नो ) | Snow |
| करडा | ( ग्रे ) | Gray |
| कुरण | ( मेडो ) | Medow |

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

| | | |
|---|---|---|
| मऊ | ( सॉफ्ट ) | Soft |
| मांजरीजात | ( कॅटकाइन्ड ) | Catkind |
| गोळा | ( फ्लेक् ) | Flake |
| वैद्य | ( फिजिशियन ) | Physicion |
| लोंकर | ( फर ) | Fur |
| पुरविणें | ( टु फर्निश ) | To furnish |
| लांब | ( लॉंग ) | Long |
| आरोग्य | ( हेल्थ ) | Health |
| विश्वास ठेवणें | ( टु ट्रस्ट ) | To trust |
| लंगडणें | ( टु लिंप ) | To limp |
| पळाला | ( फ्लेड् ) | Feld |
| लगेच | ( इन्स्टन्टली ) | Instantly |
| थांबलें | ( सीज्ड ) | Ceased |
| विश्वास वाटला | ( बिलीव्हड् ) | Believed |
| न टाळण्याजोगें | ( इनएव्हिटेबल ) | Inevitable |
| वाट दाखविणें | ( टु गाइड ) | To guide |
| मध्यरात्र | ( मिड्नाइट ) | Midnight |
| दोरीनें बांधणें | ( टु रोप ) | To rope |
| साखळीनें बांधणें | ( टु चेन ) | To chain |
| मिळविणें | ( टु प्रोक्युअर ) | To procure |
| लावून ठेवणें | ( टु फिक्स ) | To fix |
| अस्वस्थ वाटणें | ( टु फील अनईझि ) | To feel uneasy |
| तत्व | ( प्रिन्सिपल ) | Principle |
| ऊबदार | ( वॉर्म ) | Warm |
| निर्दयता | ( अन्काइन्डनेस् ) | Unkindness |
| सुमारें | ( नियर्लि ) | Nearly |
| अपराधी | ( गिल्टी ) | Guilty |

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

| | | |
|---|---|---|
| दुःखदायक | ( मोर्नफुल ) | Mournful |
| बर्फ पडणें | ( टु स्नो ) | To snow |
| पावलें | ( फुट-स्टेप ) | Foot-steps |
| उथळ भांडें | ( पॅन ) | Pan |
| मुका | ( डम्ब ) | Dumb |
| प्राणी | ( क्रीचर ) | Creature |
| मधून | ( ॲक्रॉस ) | Across |
| पट्ट्यानें बांधणें | ( टु स्ट्रॅप ) | To strap |
| योग्य | ( केपेबल ) | Capable |
| शत्रु | ( ॲन एनिमी ) | An enemy |
| प्राणरक्षक | ( व्हाइटल् ) | Vital |
| बेपर्वाईचा | ( इन्डिफरन्ट् ) | Indifferent |
| बेपर्वाई | ( इन्डिफरन्स ) | Indifferance |
| विनविणें | ( टु एन्ट्रीट ) | To entreat |
| एक दिलानें | ( युनॅनिमस्ली ) | Unanimously |
| मनुष्यजात | ( ह्यूमन ) | Human |
| लुच्चा | ( कनिंग ) | Cunning |
| स्वभाव | ( डिस्पोझिशन ) | Disposition |
| व्यर्थ दवडणें | ( टु बॅफल् ) | To baffle |
| न्यायानें | ( जस्टली ) | Justly |
| मिळाले | ( जॉइन्ड ) | Joined |
| सुख | ( ब्लिस् ) | Bliss |
| कांतडी | ( स्किन ) | Skin |
| चतुष्पाद | ( क्वाड्रपेड ) | Quadraped |
| कोल्हा | ( फॉक्स ) | Fox |
| चातुर्य | ( स्किल् ) | Skill |
| नुकतेंच | ( जस्ट ) | Just |

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

## वाक्यें—( सेन्टेन्सेस–Sentences. )

नांगऱ्या सकाळीं सूर्योदयाबरोबर लवकर उठून आपल्या शेतांत काम करायला जातो—( दि पेझन्ट रायझेस् आर्लि इन् दि मॉर्निंग, वुइथ दि सन, ॲन्ड गोज् टु वर्क इन् हिज् फील्ड–The peasant rises early in the morning with the sun, and goes to work in his field. )

त्याला वर्षभर कांहीं ना कांहीं तरी काम असतेंच–( ही हॅज ऑल्वेज् सम्थिंग टु डू, ऑल दि इयर लांग–He has always something to do all the year long. )

पण त्याला पावसांतच अधिक काम असतें यांत संशय नाहीं–( बट् नो डाउट ही इज बीझिएस्ट इन् दि रेन्स्–But no dout he is busiest in the rains. )

त्यानें आपलें नांगरण्याचें काम संपविलें म्हणजे तो आपली बीपेरणी करतो–( व्हेन् ही हॅज फिनिश्ड हिज प्लोइंग, ही सोज् सीड–When he hasfin ished his ploughing, he sows seed. )

तें जरी जमिनींत अदृश्य होते, तरी तें तेथें त्याच स्थितींत फार वेळ राहात नाहीं –( दो इट् डिसअपियर्स इन् दि ग्राउन्ड, इट् डझ् नॉट रिमेन देअर फॉर ए लांग टाइम–Though it disappears in the ground, yet it does not remain there for a long time. )

थोड्याच दिवसांच तें पुनः वर येतें, आणि आपणां सर्वांना त्याचे नवे हिरवे मोड बघण्याचा आनंद वाटतो–( आफ्टर ए फ्यू डेज्, इट् कम्स् अप् अगेन, ॲन्ड वुइ आर ऑल ग्लॅड टु सी दि यंग ग्रीन शूट्स्–After a few days it comes up again and we are all glad to see the young green shoots. )

कोळी समुद्रकांठीं राहून आपलें छोटेसें घरटें वाळूंत अथवा खडकांत बांधतो–( ए फिशर्मन लिव्हज् बाय दि शोअर ऑफ दि ओशन, ॲन्ड बिल्डस् हिज् लिटल हट

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

ऑव दि सॅन्ड ऑर अमंग दि राक्स्–A fisherman lives by the shore of the ocean and builds his little hut on the sand or among the rocks. )

पावसाळ्यांत नांगऱ्या आपल्या कामांत जेव्हां गर्क असतो, तेव्हां कोळी निरुद्योगी असतो; कारण त्यावेळीं त्याला समुद्रांत जायला वारा फार जोराचा वाहात असतो.–( इन् दि रेन्स् व्हेन् दि पेझन्ट इज बीझी, दि फिशर्मन् इज आयडल्; फॉर, दि वुइन्ड इज् टु स्ट्रॉंग फॉर हिम टु गो टु सी–In the rains when the pesant is busy the fisherman is idle, for the wind is too strong for him to go to sea. )

पावसाळ्याच्या अखेरीस, तो आपल्या पडावाची डागडुगी करून समुद्रांत जातो–(व्हेन् दि रेन्स हॅव कम् टु ॲन एन्ड, ही पुट्स हिज् बोट इन ऑर्डर ॲन्ड गोज् टु सी–When the rains have come to an end, he puts his boat in order and goes to sea. )

तांदुळ म्हणजे काय तें आपणां सर्वांना माहीत आहे आणि ते कसे होतात हें दि आपणापैकीं बहुतेकांनीं पाहिलें आहे–( वुइ ऑल नो व्हॉट राइस इज् ॲन्ड मोस्ट ऑफ अस हॅव सीन इट् ग्रोइंग–We all know what rice is and most of us have seen it growing. )

ज्या प्रांतांत पुष्कळ पाऊस पडतो व जेथें विपुल पाणी असतें तेथें तें येतात–( इट् ग्रोज् इन् कन्ट्रीज व्हेअर दि रेन इज् हेवी ॲन्ड व्हेअर देअर इज प्लेन्टी ऑफ वॉटर –It grows in countries where the rain is heavy and where there is plenty of water. )

एके दिवशीं सकाळीं गजाननाचा बाप लक्ष्मण म्हणाला, " गजानन किंवा गोपीनाथ यांपैकीं कोणीच अजून राणीचा बाग पाहिला नाहीं; आज दुपारीं तो बघायला जाऊं या "–( वन् डे गजानन्स फादर लक्ष्मण सेड, " नीदर गजानन ऑर गोपीनाथ हॅज सीन दि व्हिक्टोरिया गार्डन्स; लेस अस गो टु सी इट धिस आफ्टरनून—

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

One day morning Gajanan's father Lakshman said " neither Gajanan nor Gopeenath has seen the Victoria Gardens, let us go to see it this afternoon. " )

बागेंतलि जनावरें बघण्याचें मुलांना फारच नवलाचें वाटलें आणि तीं एकदम वाघ बघायला गेलीं–( दि चिल्ड्रेन वेअर व्हेरी क्यूरियस् टु सी दि ॲनिमल्स इन् दि गार्डन् , ॲन्ड दे वेन्ट ॲट वन्स टु सी दि टायगर–The children were very curious to see the animals in the garden, and they went at once to see the tiger. )

हिंदुस्तानांत जरी फार थोडे सिंह आहेत, तरी अद्यापि कांहीं काठेवाडांतल्या गिरनारच्या जंगलांत दृष्टीस पडतात.–( दो देअर आर व्हेरी फ्यू लायन्स इन् इन्डिया, यट यू मे स्टिल् सी ए फ्यू इन् दि गिर फॉरेस्ट इन काठियावॉर–Though there are very few lions in India, yet you may still see a few in the Gir forests in Kathiawar. )

तुम्हीं कधीं सिंहगर्जना ऐकली आहे काय ?–( हॅव यू एव्हर हर्ड ए लायन रोअर–Have you ever heard a lion roar ? )

प्राणिसृष्टींत सिंहगर्जना ही फार जोराची आणि अति भीतिप्रद आवाजाची आहे –( दि लायन्स रोअर इज ऑफ दि लाउडेस्ट ॲन्ड मोस्ट ट्रिमेन्डस इन् दि वर्ल्ड ऑफ ॲनिमल्स--The lion's rour is of the loudest and most tremendeus sound in the world of animals. )

तीनशें वर्षांपूर्वी दिल्ली शहरांत एकदां एक हत्ती मोकळा सुटला आणि तेथल्या रस्त्यांतून पळाला--( थ्री हन्ड्रेड इयर्स ॲगो इन् दि सिटी ऑफ देहली ॲन एलिफन्ट वन्स ब्रोक लूज् ॲन्ड रॅन फियर्सली अलॉंग दि स्ट्रीट्स्--Three hundred years ago in the city of Delhi an elephant once brock loose and ran fiercely along the streets. )

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

इंग्लंडांत वार्षिक असे मुख्य चार ऋतु असतात आणि हिंदुस्तानांत तीन असलेले आपणांस बघायला सांपडतात--( इन् इंग्लंड देअर आर फोर प्रिन्सिपल सीझन्स इन ए इयर, ॲन्ड इन इन्डिया वुइ मे सी थ्री--In England there are four principal seasons in a year, and in India we many see three. )

पावसाळा सुरू झाला म्हणजे सृष्टीसौंदर्यात फारच बदल होतो ?-( व्हेन दि रेन बिगिन्स, लो, व्हॉट ए चेंज कम्स इन् नॅचरल ब्युटि-When the rain begins, to, what a change comes in the natural beauty. )

धूसर टेंकड्या हिरव्या होतात, नद्या पाण्यानें भरून जातात आणि सर्वत्र जिवंतपणाच्या खुणा भासमान होतात-( यलोइश हिल्स ग्रो ग्रीन, रिव्हर्स फिल वुइथ वॉटर ॲन्ड देअर आर साइन्स ऑफ लाइफ एव्हरीव्हेअर-Yellowish hills grow green, the rivers fill with water and there are the signs of life everywhere. )

तुझ्या बागेंत कदाचित कांहीं उंच झाडें, आंब्याची झाडें आणि चिंचेचींहि असतील-( पर्हाप्स देअर वुइल बी इन युवर गार्डन सम टॉल ट्रीज, मॅंगो ट्रीज-ॲन्ड टॅमरिंड ट्रीज्-Perhaps there will be in your garden some tall trees, mango trees and tamarind trees. )

तुझा बाग जरी लहान असला तरी तुला तेथें कांहीं सुंदर झाडें लावितां येतील-( हौएव्हर स्मॉल इज युवर गार्डन, यू कॅन ग्रो देअर सम ब्यूटिफुल ट्रीज-However small is your garden, you can grow there some beautiful trees. )

तूं तेथें जाईचे वेल आणि कांहीं गुलाबाचीं रोपटीं : लावूं शकशील-( यू मे प्लॅन्ट देअर जाई क्रीपर्स ॲन्ड सम ऑफ रोझेट टू-You may plant there Jayi creepers and some plants of roses too. )

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

असें केल्यानें तुला सबंद वर्षभर फुलांचा मधुर वास आणि सुंदर रंग यांचा ये... भोग घ्यायाला सांपडेल-( इन् डूइंग सो यू वुइल एन्जॉय ए फीस्ट ऑफ स्वीट स्मे... एन्ड ब्राइट कलर्स ऑफ दि फ्लॉवर्स ऑल इयर रौन्ड-In doing so you will enjoy a feast of sweet smell and bright colours of the flowers all the year round.)

"आज किती उकडतें आहे?" असें गाडीचा पिंगट घोडा गाडा ओढीत अ... तांना बोलला आणि "कांहीं हरकत नाहीं. कदाचित् कोपऱ्यावर आपल्याला पाणी प्या... यला मिळेल" असें पांढरा घोडा म्हणाला-( "व्हॉट ए हॉट डे धिस् इज?" सेड दि ब्राऊन हॉर्स ऍज ही वेन्ट ऑन पुलिंग दि कॅरेज. "नेव्हर माइन्ड," सेड दि व्हाइट हॉर्स," पर्हाप्स वुइ शॅल गेट ए ड्रिंक ऍट दि कॉर्नर."-"What a hot day this is!" said the brown horse as he went on pulling the carriage. "Never mind" said the white horse "perhaps we shall get a drink on the corner.")

ज्या ठिकाणीं दोन नद्या एकमेकींना मिळतात आणि जेथें सर्व वर्षभर पाणी अस... असें एक दक्षिणेंतील लहानसें शहर मला माहीत आहे-( आय नो ए लिटल टाउन इन दि डेक्कन व्हेअर टू रिव्हर्स मीट ऍन्ड देअर इज वॉटर ऑल दि इयर रौन्ड-I know a little town in the Deccan where two rivers meet and there is water all the year round.)

त्या दोहींच्या मधल्या जमिनीवर एक देऊळ असून, त्याच्या पुढच्या भागीं ए... मोठा नंदी आहे-( देअर इज ए टेम्पल ऑन दि ग्राऊन्ड बिटवीन् देम्, वुइथ ए ग्रे... बुल इन् फ्रन्ट ऑफ इट-There is a temple on the ground between them, with a great bull in front of it.)

प्रवाहाच्या पलीकडे भव्य दगडी भिंतीचा किल्ला असून पाण्यापर्यंत जाण्यास क... पायऱ्यांची रांग आहे-( ऍक्रॉस दि स्ट्रीम् देअर इज ए फोर्ट, वुइथ ह्यूज स्टोन वॉल्स ऍन्ड ए लॉंग रो ऑफ स्टेप्स लीडिंग डौन टु दि वॉटर-Across the stream

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

there is a fort with huge stone walls and a long row of steps leading down to the water.)

कुंभार आपल्या समोर चाक आणि बाजूला मातीचा ढीग घेऊन जमिनीवर बसतो -(दि पॉटर सिटस ऑन दि ग्राउन्ड वुइथ ए व्हील इन् फ्रन्ट ऑफ हिम् ऍन्ड ए हीप ऑफ क्ले ऍट हिज साइड-The potter sits on the ground with a wheel in front of him and a heap of clay at his side.)

तो काठीनें चाक फिरवितो आणि तें चालू झालें म्हणजे त्यावर थोडी माती टाकतो -(ही टर्न्स दि व्हील वुइथ ए स्टिक ऍंड व्हेन ही हॅज स्टार्टेड इट् ही थ्रोज सम क्ले ऑन इट—He turns the wheel with a stick, and when he has satrted it he throws some clay on it.)

नंतर तो आपल्या हातांत माती घेतो आणि तिला भांड्याचा आकार दिल्यावर त्यांना तो उन्हांत सुकवितो किंवा भाजतो--(देन ही टेक्स दि क्ले इन् हिज हॅन्डस ऍन्ड मोल्डस इट इन्टु पॉटस, वुइच आफ्टर्वर्डस् ही ड्राइज इन् दि सन ऑर बर्न्स-- Then he take the clay in his hands and moulds it into pots which afterwards he dries in the sun or burns.)

---

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

# THE NATIONAL ENGLISH TEACHER.



# दी नॅशनल इंग्लिश टीचर.

अर्थात्

# राष्ट्रीय इंग्रजी शिक्षक.



## PART SECOND.

## भाग २ रा.



### बोलण्यांतील कांहीं विशिष्ट शब्द आणि वाक्यें.

( सम इडियॅमेटिक सेन्टेन्सेस्–Some Idiamatic sentences )

फुलांचा गुच्छ– ( ए बोका ऑफ फ्लॉवर्स ) A boquet of flowers,
काठ्यांची जुडी–( ए बन्डल ऑफ स्टिक्स ) A bundle of sticks.
सकाळचें नमन–( गुड मॉर्निंग ) Good morning.
दुपारचें नमन–( गुड नून ) Good noon.
दिवसाचें वाटेल तेव्हांचें नमन–( गुड डे ) Good day.
सायंकाळचें नमन–( गुड नाइट् ) Good night.
निरोप घेतांचें नमन–( गुड बाय ) Good bye.
बायकांची छत्री–( पॅरासोल ) Parasole.
पुरुषांची छत्री–( ( अम्ब्रेला ) Umbrella.
विमानांतून उतरण्याची छत्री–( पराच्यूट ) Parachute.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri



पुरुषांचा गळपट्टा–( कम्फरटर ) Comfertor.
स्त्रियांचा गळपट्टा–( बावा ) Bowa.
ठोसाठोशी–( बॉक्सिंग ) Boxing.
कुडतें–( बनॅन ) Banan.
स्त्रियांची बंडी–( पोल्का ) Polca.
गंजीफराक–( गंजीफ्रॉक ) Gangifroc.
हरिणांचा कळप–( ए हर्ड ऑफ डियर ) A herd of deer.
माशांचा घोळका–( ए शोल ऑफ फिश् ) A shoal of fish.
माशांचा थवा–( ए स्वॉर्म ऑफ फ्लाइज ) A swarm of flies.
द्राक्षांचा घड–( ए बंच ऑफ ग्रेप्स ) A bunch of grapes.
हंसांचा तांडा–( ए फ्लॉक् ऑफ गीज ) A flock of gees.
किल्यांचा जुडगा–( ए बंच ऑफ कीज् ) A bunch of kees.
धान्याचें कोठार–( ए स्टॉक ऑफ कार्न ) A stock of corn.
जिना, दादर–( ए फ्लाइट ऑफ स्टेप्स ) A flight of steps.
मेंढरांचा कळप–( ए फ्लॉक ऑफ शीप् ) A flock of sheep.
लांकडांचा ढीग–( ए स्टॉक ऑफ वुड ) A stock of wood.
जोडा ( पायांतला )–( ए पेअर ऑफ शूज ) A pair of shoes.
डुकरांचा कळप–( ए हर्ड ऑफ स्वाइन ) A herd of swine.
मुंग्यांचें वारूळ–( ऍन ऍन्टहील् ) An ant-hill.
मधाचें पोळें–( हनी–कोंब् ) Honey-comb.
उकिरडा–( डंग-हिल् ) Dung-hill.
चोरांची टोळी–( ए गॅंग ऑफ रॉबर्स ) A gang of robbers.
टोळधाड–( ए स्वॉर्म ऑफ लोकस्ट्स् ) A swarm of locusts.
तारकापुंज–( ए क्लस्टर ऑफ स्टार्स ) A cluster of stars.
पुष्पमाला–( गार्लंड ऑफ फ्लॉवर्स ) A garland of flowers.
आरब लोक–( ए ट्राइब ऑफ ऍरब्ज ) A tribe of Arabs.



CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

पक्षिसमुदाय—( ए फ्लाइट ऑफ बर्ड्स ) A flight of birds.
पावसाची सर—( ए शॉवर ऑफ रेन् ) A shower of rain.
दगडांचा ढिगारा—( ए हीप ऑफ स्टोन्स ) A head of stones.
माणसांची गर्दी—( ए क्राउड ऑफ पिपल्स ) A crowd of peoples.
पर्वतांची रांग—( ए चेन ऑफ माउन्टन्स ) A chain of mountains.
वृक्षराजी—( ए ट्री-पार्क् ) A tree-park.
अधाशी, वृकोदर—( हाऱ्याशिवाय ) Voracious.
आंबराई—( ए मँगो-पार्क ) A mango-park.
केळ्यांचा फणा—( ए बन्च ऑफ प्लॅन्टेन्स ) A bunch of plantains.
बेटांचा समुदाय—( ए ग्रुप ऑफ आय्लंड्स ) A group of islands.
गव्हांची पेंढी—( ए शीप ऑफ व्हीट ) A sheep of wheat.
लांडगेघाड—( ए पॅक ऑफ वूल्व्हज ) A pack of wolves.
कुत्र्यांची टोळी—( ए पॅक ऑफ डॉग्ज ) A pack of dogs.
लाकडांची मोळी—( ए बंडल ऑफ फायर-वुड ) A bundle of fire-wood.
सैन्याची तुकडी—( ए रेजिमेन्ट ऑफ सोल्जर्स ) A regiment of soldiers.
गोष्टींची परंपरा—( ए सीरिज् ऑफ इव्हेन्टस ) A series of events.
राजाचें भाषण—( ए स्पीच् फ्रॉम् दि थ्रोन् ) A speech from the throne.
पत्राचें उत्तर—( ए रिप्लाय टु ए लेटर ) A reply to a letter.
पुस्तकांतला विषय—( दि कन्टेन्ट्स ऑफ ए बुक) The containts of a book
वकीलाचे कागदपत्र—( लॉयर्स डॉक्युमेन्टस ) lawyers documents.
प्रश्नोत्तर—( ॲन ॲन्सर टु ए क्वश्चन् ) An answer to a question.
घर-सामान—( दि फर्निचर ऑफ ए हौस ) The furniture of a house.
शेत-जनावरें—( दि बीस्टस ऑफ दि फील्ड ) The beasts of the field.
भक्ष्य प्राणी—( दि बिस्ट ऑफ प्रे ) The beast of prey.
हवेंतले प्राणी—( दि फाऊल्स ऑफ दि एअर ) The fowls of the air.
समुद्रांतले मासे—( दि सी फिश् ) The sea fish.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

शेतफुलें—( दि लिलीज ऑफ दि फील्ड ) The lilies of the field.
मात-किडे—( दि डस्ट-वर्म्स ) The dust-worms.
सुतारी हत्यारें-( दि टूल्स ऑफ दि कार्पेंटर ) The tools of the carpenter
गिरण-यंत्रें—( दिं मिल्-मशिनरी ) The mill-machinary.
शेतकीचीं आउतें—( दि फार्म इम्प्लिमेंन्ट्स ) The farm-implements.
गुदाम, कोटी—( ए गो-डाउन ) A go-down.
वाळवंटांतलें जहाज—( ए शिप ऑफ दि डेझर्ट ) A ship of the desert.
सारवान—( कॅमेलीर ) Cameleer.
खोड मोडणें—( टु अम्बल हॉटिनेस् ) To humble haughtiness.
पेंचांत सांपडणें—( टु फॉल इन्टु ए ट्रॅप् ) To fall into a trap.
गगनाशीं गांठ घेणें—( टु परफॉर्म एक्सप्लॉइट्स ) To perform exploits.
हातघाईला येणें—( टु बिकम् इम्पेशन्ट ) To become impetient.
अडीपिलीं माहीत असणें—( टु नो इन्स ऍन्ड औट्स ) To know ins and outs.
अत्तराचे दिवे लावणें—( टु बी एक्स्ट्रॅव्हेगन्ट ) To be extravagant.
अन्नसत्र घालणें—( टु फीड ग्रॅटिस ) To feed gratis.
अन्न तुटणें—( टु लूज ऍपिटाईट ) To lose appetite.
अन्नाला लावणें—( टु प्रोव्हाइड् ऍन् एम्प्लॉयमेन्ट ) To provide an employment.
अरण्यरुदन करणें—( टु क्राय इन् वाइल्डर्नेस ) To cry in wilderness.
अंबारींत बसणें—( टु गो ए बेगिंग ) To go a begging.
अंथरुणाला खिळणें—( टु टेक टु बेड् ) To take to bed.
अंत पाहाणें—( टु ट्राय दि अट्मोस्ट ) To try the utmost.
अरेतुरेवर येणें— } (टु बिगिन् वुइथ दी ऍण्ड दौ) To begin with thee and thou.
हमरीतुमरीवर येणें— }
अन्नास मोताद होणें—( टु बिकम् ए बेगर )—To become a beggar.
अक्षत घेणें-( टु ॲक्सेप्ट ऍन इन्व्हिटेशन ) To accept an invitation.
„ देणें-( टु इनव्हाइट ) To invite.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

आकारास येणें–( टु अटेन ए डेफिनेट शेप ) To attain a definite shape.
आहुती देणें–( टु कास्ट इन्टु डेन्जर ) To cast into danger.
उखाणा सांगणें–( टु सॉल्व्ह ए रिडल ) To solve a riddle.
उचापतीवर जगणें—( टु लिव्ह अपॉन क्रेडिट ) To live upon credit.
उजळ माथा होणें–( टु बि ऍक्विटेड ) To be acquited.
ळंपट होणें–( टु बि ईगर आफ्टर ) To be eager after.
उणें राहणें–( टु नोटिस फॉल्ट ) To notice fault.
उदक सोडणें–( टु अबॅन्डन् ) To abandon.
उदरीं शनी येणें–( टु हॅव ए रन ऑफ गुड लॅक ) To have a run of good luck.

ओघाला येणें–( टु फॉल इन्टु दि कोर्स ) To fall into the course.
ओंजळीनें पाणी पिणें–( टु फॉलो ऍन इंप्लिसिटि ) To follow an implicity.
औषधाला नसणें–( टु बि वॉंटिंग ऑलटुगेदर ) To be wanting altogether.

उद्यांचें मरण आज आणणें—( टु ऍन्टिसिपेट ऍन ईव्हल ) To anticipate an evil.

कंठ दाटणें–( टु बि चोक्ड ) To be choked.
कंटस्नान घालणें–( टु कट थ्रोट ) To cut throat.
कंठीं प्राण येणें–( टु बि ऑल्मोस्ट डेड ) To be almost dead.
,, उतरणें–( ,, ,, ,, डिस्ट्रेस्ड ) ,, ,, ,, distressed.
कणीक तिंबणें–( टु बीट सिव्हिअर्ली ) To beat severely
खरडपट्टी काढणें—( टु स्कोल्ड व्हियिमेंटली ) To scold vehemently
उफाड्यानें वाढणें—( टु ग्रो रॅपिडली ) To grow rapidly
उरीं डोंगर घेणें—( टु अंडरटेक ए ग्रेट टास्क ) To undertake a great task.

उरीं फुटणें–( टु बि नॉक्ड अप ) To be knocked up.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

ऊर काढून चालणें–( टु स्टार्ट हॉटिली ) To start haughtily.
ऊर दडपणें–( टु लूज करेज ) To lose courage.
ऊर फाटणें–( टु अलार्म ) To alarm.
गळीं पडणें–( टु इम्पॉर्च्यून् ) To importune.
आकाशपाताळ एक करणें—( टु मेक हेवन ॲन्ड अर्थ वन ) To make heaven and earth one.
गाभण असणें–( टु बि वुइथ कॉफ ) To be with calf.
गर्भार होणें–( टु कन्सीव्ह ) To conceive.
स्वर्ग दोन बोटें उरणें–( टु बि एक्सीडिंगली प्राउड ) To be exceedingly proud.
इंगळासारखें होणें–( टु बि फायरी ) To be firey.
आपलें घर भरणें–( टु फेदर वन्स नेस्ट ) To feather one's nest.
आपलेंच घेऊन बसणें–( टु हॅव वन्स ओन वे ) To have one's own way.
आभाळावर चढणें–( टु बि ॲरोगन्ट ) To be arrogant.
आल्या पावलीं परतणें–( टु रिटर्न इन्स्टन्टली ) To return instantly.
आसन डळमळणें–( टु टॉटर सीट ) To totter seat.
आसन गुंडाळणें–( टु पॅक अप ) To pack up.
वाऱ्याशीं भांडणें–( टु किक दि वुइन्ड ) To kick the wind.
आपलेंसें करणें–( टु कॅरी वन्स ओन पॉइन्ट ) To carry one's own point.
अंथरूण धरणें–( टु कन्फाइन टु बेड ) To confine to bed.
आढेवेढे घेणें–( टु प्लीड एक्सक्यूज ) To plead excuse.
अंगावर बेतणें–( टु बी इन डिफिकल्टी ) To be in difficulty.
अजगरासारखें पोसणें–( टु ग्रो फॅट ) To grow fat.
अंगवळणीं पडणें–( टु बि अकस्टम्ड् टु ) To be accustomed to.
अजगरासारखें पडणें–( टु लाय लेझिली ) To lie lazily.
अंगाचा तिळपापड होणें—( टु बि फ्यूरियस ) To be furious.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

अंगाचें पाणी होणें-( टु अन्डरगो ग्रेट लेबर ) To undergo great labour.
अंगावर येणें-शेकणें-( टु सस्टेन ए लॉस ) To sustain a loss.
अंगीं मिरच्या लागणें-( टु गेट एक्सायटेड ) To get excited.
अंगीं बाणणें-भिनणें—( टु बिकम फमीलियर ) To become familier.
गाय पिळणें—( टु मिल्क ए कौ ) To milk a cow.
खुष होणें-( टु बि सॅटिस्फाइड ) To be satisfied.
गालावर गाल चढणें-( टु गेट प्लम्पी ) To get plumpy.
गुळणा धरणें-( टु कीप सीक्रेट ) To keep secret.
गोडी लागणें-( टु बी फॉन्ड ऑफ ) To be fond of.
घर भरणें-( टु टेक ए वाइफ ) To take a wife.
,, -( टु मिस-अप्रेप्रिएट ) To mis-appropriate.
घर बसणें-( टु रुइन ) To ruin.
घरीं बसणें-( टु बी वुइदाउट ऍन एम्प्लॉयमेन्ट ) To be without an employment.
घरीं येणें—( टु बिकम ए वुइडो ) To become a widow.
घरदार थाटणें-( टु मेक होम ) To make home.
घर चालविणें—( टु मॅनेज डोमॅस्टिक अफेअर्स ) To manage domestic affairs.
घडी भरणें—( टु हॅव वन्स कप फुल् ) To have one's cup full.
घसा बसणें—( टु लूज व्हॉइस् ) To lose voice.
घोडें थकणें-( टु टायर आउट ) To tire out.
घोडें पुढें ढकलणें-( टु राइड हॅवी ) To ride habby.
चौपदरी गळा काढणें-( टु बॉल लौडली ) To ball loudly.
चौदावें रत्न दाखविणें-( टु बीट सौन्डली ) To beat soundly.
चक्कर मारणें-( टु टेक ए रन ) To take a run.
चट्टा बसणें-( टु सफर ए लॉस ) To suffer a loss.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

चंदन करणें–काढणें–( टु बीट हेविली ). To beat hevily.
चिठ्या टाकणें–( टु कास्ट लॉट्स ) To cast lots.
चूलींत जाणें–( टु गो टु पॉट ) To go to pot.
चुळमुळ लागणें–( टु फील रिग्रेट ) To feel regret.
चाळ चोंटणें–( टु फॉन अपॉन ) To fown upon.
जड पारडें होणें—( टु बिकम ऑप्युलन्ट ) To become opulent.
जिभेला चिमटा घेणें—( टु होल्ड टंग ) To hold tongue.
तोंड आवरणें–आटपणें–( ,, ,, ) ,, ,,
जपमाळ घेणें–( टु हार्प ऑन ) To harp on.
जाळांत जाळणें–( टु टॉर्मेन्ट ग्रीव्हियस्ली ) To torment greviously.
जोंधळें उचलणें–( टु टेक ऍन ओथ ) To take an oath.
जिवावर येणें–( टु बेअर हार्ड अपॉन ) To bear hard upon.
जीव गोळा होणें—( टु बि अबाउट टु डाय ) To be about to die.
जीभ वळवळणें–( टु स्कोल्ड ग्लिब्ली ) To scold glibly.
जीव मेटाकुटीस येणें–( टु बि एक्झॉस्टेड ) To be exhausted.
झा करणें—( टु डी–कॅम्प ) To de–camp.
टणटण उडणें–( टु टर्न अपॉन शार्पलि ) To turn upon sharply.
टक्के करणें–( टु मेक मनी ऑफ ) To make money of.
टेंभा मिरविणें–पाजळणें—( टु बिकम नोटोरियस ) To become notorious.
टाळी देणें–( टु सेटल ऑर स्ट्राइक ए बार्गेन ) To settle or strike a bargain.
टाकून बोलणें–( टु स्पीक अब्यूसिव्हली ) To speak abusively.
ठिकरी तापणें–( टू बि व्हेरी ऍंग्री ) To be very angry.
डाव लागू होणें–( टु लूज दि गेम ) To lose the game.
डेरा देणें–( टु पुट अप् वुइथ ) To put up with.
डोकें वर काढणें–( टु राइझ अप् फ्रॉम पॉव्हर्टि ) To rise up from poverty

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

कपाळ उठणें—( टु गेट ए हेड-एक् ) To get a head-ache.
कपाळ फुटणें–( टु बि रुइन्ड ) To be ruined.
कपाळीं येणें—( टु फॉल टू लॉट ) To fall to lot.
कंबर बांधणें—( टु गर्ड अप लॉयन्स ) To gird up loins.
कांखा वर करणें—( टु बि बँक्रप्ट ) To be bankrupt.
काडी मोडून देणें–( टु डिझॉल्व मॅरेज ) To desolve marriage.
घटस्फोट करणें—( „ „ ) „ „
काडी मोडून मागणें—( टु आस्क फॉर डायव्होर्स ) To ask for divorce.
कान उपटणें–( टु रिमॉन्स्ट्रेट ) To remonstrate.
कान फुंकणें—( टु प्रेजुडिस वन्स माइन्ड ) To perjudice one's mind.
कान पिळून घेणें–( टु टेक वॉर्नींग ) To take warning.
कान पिळणें—( टु वॉर्न ) To warn.
कानावरून जाणें-( टु कम् टु दि इयर ) To come to the ear.
काळजाला धक्का बसणें–( टु शॉक पेन्फुली ) To shock painfully.
काळजाला घरे पडणें–( „ „ ) „ „
कित्ता घालणें–( टु सेट ऍन एक्झॅम्पल् ) To set an example.
उदाहरण करून ठेवणें–( „ „ ) „ „
कींव करणें–( टु शो कम्पॅशन ) To show compassion.
कैलासवासी होणें—( टु डाय ) To die.
खडे फोडणें–( टु बि एक्सायटेड इन्टु फ्यूरी ) To be axcited into fury.
खाड्यांत पडणें–( टु इन्कर रुइन ) To incure ruin.
गृहस्थ होणें—( टु बि मॅरीड ) To be married.
डोळेझाक करणें–( टु कनाइव्ह ऍट ) To cunnive at.
डोळे झाकणें–( टु डाय ) To die.
डोळ्यांत लाज येणें–( टु बि ब्रेझन--फेस्ड ) To be brasen--faced.
डोळ्यावर पटल येणें—( टू बिकम प्राउड ) To become proud.
बोंऱ्या वाजणें–( टु बि डिस्ग्रेस्ड् ) To be disgraced.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

भिजत पडणें-( टु बि सस्पेन्डेड ) To be suspended.
मन उडणें-( टु बि डिस्गस्टेड वुइथ ) To be disgusted with
मन मोठें करणें-( टु ॲक्ट जनरस्ली ) To act generously.
मन मोडणें-( टु रिफ्यूज टु ग्रॅटिफाय ) To refuse to gratify.
मनांत मांडे खाणें-( टु बिल्ड कॅसल्स इन दि एअर ) To build castles in the air.
मातीमोलानें विकणें-( टु सेल डर्ट चीप ) To sell dirt cheap.
वाऱ्यावर टाकणें—( टु कास्ट ॲड्रिफ्ट ) To cast adrift.
लावून बोलणें—( टु टॉन्ट ) To taunt,
लावालावी करणें—( टु सेट बाय दि इयर्स ) To set by the ears.
वेड्याचें सोंग घेणें—( टु फेन मॅड्नेस ) To feign madness.
व्यूह रचणें—( टु डिव्हाइस स्कीम्स ) To devise schemes.
स्मरणीं घेणें—( टू कीप एव्हर इन माइन्ड ) To keep ever in mind.
सत्व पाहणें—( टु ट्राय वन्स व्हर्च्यु ) To try one's virtue.
सत्व टाकणें–सोडणें—( टू लुज् व्हर्च्यु ) To lose virtue.
हातपाय गाळणें—( टू अबॅन्डन करेज ) To abandon courage.
हातावर तुरी देणें—( टु रन अवे बोल्ड्ली ) To run away boldly.
हार खाणें—( टु टेक अलार्म ॲट ) To take alarm at.
हात झाडणें—( टु रिफ्यूज अटर्लि ) To refuse utterly.
हात धुणें-( टु वॉश ऑफ हॅन्ड्स ) To wash of hands.
हातपाय पांघरून बसणें-( टु सिट ऐडल ) To sit idle.
हात मोडणें-( टु टॉर्मेन्ट क्रूएली ) To torment cruelly.
हात चालणें-( टु हॅव पॉवर ) To have power.
हातघाईवर येणें-( टु कम टु ब्लोज ) To come to blows.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

इंग्रजी भाषेतील कांहीं म्हणी. ( सम् प्रॉव्हर्ब्स इन् दि इंग्लिश लँग्वेज—Some proverbs in the English language.)

अकलेचा खंदक–( वाइझ–एकर—Wise-acre. )

अंगीं असेल तें काम आणि पदरीं असेल तो दाम—( रिलायन्स कॅन् बि प्लेस्ड् ऑन् सेल्फ ॲन्ड ऑन व्हॉट वन् पझेसेस्, नॉट ऑन अदर्स–Reliance can be placed on self and on what one possesses, not on others.)

अंगापेक्षां मोठा बोंगा, कोठें जातोस सोंगा ?–( मेक् नॉट दाय टेल ब्रॉडर दॅन् दाय् वुइंग्–Make not thy tail broader than thy wing. )

अडक्याच्या देवतेला सावक्याचा शेंदूर—( लिटल् डिएटि मच ऑइन्टमेन्ट–Little deity much ointment. )

अडला नारायण गाढवाचे पाय धरी—( ए ड्रौनिंग मॅन वुइल कॅच ॲट् ए स्ट्रॉ–A drowning man will catch at a straw. )

अठरा विश्वे दारिद्र्य—( एक्स्ट्रीम पॉव्हर्टी—Extreme poverty.)

अर्धचंद्र—( ए डुच बाय दि नेक –A dutch by the neck.)

अपापाचा माल गपापा–( इल् गॉटन् इल् स्पेन्ट–Illgotten illspent.)

अरण्यपंडित—( ए ब्लन्ट फिलॉसफर—A blunt philosopher.)

अल्पमोली बहु दुधी—( चीप बट ल्युक्रेटिव्ह–Cheap but lucrative.)

अल्पविद्या बहु गर्वी—( शॅलो ब्रुक्स आर नॉइझी–Shallow brooks are noisy. )

अल्लाची गाय—( ॲन् इनऑफेन्सिव्ह वन्–An inoffensive one.)

अळवावरचे पाणी—( ट्रॅन्झियन्ट–Transient. )

असतील शितें तर जमतील भुतें—( ए फुल् पर्स नेव्हर लॅक्स् फ्रेन्ड्स—A full purse never lacks friends. )

असंगाशीं संग आणि प्राणाशीं गांठ—( ए बॅड कम्पनी लीड्स टु रुइन–A bad company leads to ruin. )

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

गरज सरो, वैद्य मरो--( ए फिग् फॉर दि डॉक्टर व्हेन् क्युअर्ड—A fig for the docter when cured. )

गाढवापुढें वाचली गीता, कालचा गोंधळ बरा होता—( कास्टिंग पर्लस् बिफोर ए स्वाइन्–Casting pearls before a swine. )

एका माळेचे मणी--( बर्ड्स ऑफ् दि सेम् फेदर्स्–Birds of the same feathers. )

गांव तेथें म्हारवडा--( एव्हरी लाइट हॅज् इट्स् शॅडो–Every light has its shadow. )

घी देखा लेकिन बडगा नहीं देखा—( हनी ईज स्वीट बट दि बी स्टिंग्ज— Honey is sweet but the bee stings. )

चामडी देईल पण दमडी देणार नाहीं—( मोस्ट स्टिन्जी–Most stingy. )

चार दिवस सासूचे, चार दिवस सुनेचें—( एव्हरी डॉग हॅज इट्स् डे–Every dog has its day. )

चिंतेपेक्षां चिता कठीण—( केअर वुइल् किल् ए कॅट–Care will kill a cat. )

उचलली जीभ लावली टाळ्याला—( नो सुनर सेड दॅन डन–No sooner said than done. )

आळशाला दुप्पट काम—( ए वर्क इल डन मस्ट बि ट्वाइस डन—A work ill done must be twice done. )

इकडे आड तिकडे विहिर—( ए डायलमा बिटविन टू डिफिकल्टीज्—A dilemma between two difficulties. )

उंदरास मांजर साक्षी—( नो इन्टरेस्टेड् वुइटनेस इज ऑफ एनी वेट—No interested witness is of any weight. )

उपड्या घागरीवर पाणी—( इंस्ट्रक्शन टू दि डेफ्–Instruction to the deaf. )

उथळ पाण्याला खळखळ फार—( शॅलो वॉटर मेक्स मच नॉइज–Shallow water makes much noise. )

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

उद्यांच्या आदितवारीं—( ऑन ग्रीक कॅलेन्डस–On Greek calends.

ताकापुरतें रामायण—( सर्व्हिस अकॉर्डिंग टू रेम्युनरेशन्–Service according to remuneration. )

न देवाय न धर्माय—( टु नो गुड् पर्पज्–To no good purpose.)

नाचतां येईना म्हणे आंगण वांकडें—( ए बॅड वर्कमन् फाइन्डस् फॉल्ट विथ हिज् टूल्स्–A bad workman finds fault with his tools.)

लोकां सांगे ब्रह्मज्ञान, आपण कोरडे पाषाण—( दि पॉट् कॉल्स दि केटल् ब्लॅक–The pot calls the kettle black. )

वासरांत लंगडी गाय शहाणी—( ए फिगर अमंग सायफर्स–A figure among ciphers. )

व्यक्ति तितक्या प्रकृति—( मेनी मेन् मेनी माइन्डस्–Many men many minds. )

आगींतून निघून फुपाट्यांत पडणें—( टु फ्लाय फ्राम दि फ्राइंग पॅन् इन्टु दि फायर–To fly from the frying pan into the fire. )

अडणीवरचा शंख—( ए फूल सीटेड ऑन ए हाय प्लेस–A fool seated on a high place. )

अंतकाळापेक्षां माघ्यान्हकाळ कठीण—( हंगर ईज हार्डर दॅन डेथ्–Hunger is harder than death. )

अतिपरिचयादवज्ञा—( टू मच् फॅमिलिॲरिटी ब्रीड्स् कन्टेम्प्ट–Too much familiarity breeds contempt. )

अति तेथें माती—( एक्सेस् लीडस् टु रुइन्–Excess leads to ruin.)

अति राग भीक माग—( पॅशन् लीडस् टु पॉव्हर्टि–Passion leads to poverty. )

अति सर्वत्र वर्जयेत—( अव्हॉइड एक्सट्रीम्स–Avoid extremes. )

अंधळ्यापुढें नाच, बहिऱ्यापुढें गाणें—( ग्रँटिंग फेव्हर्स व्हेअर दे आर नॉट व्हॅल्यूड–Granting favours where they are not valued. )

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

अंधाच्या गाई देव राखतो–( प्रॉव्हिडन्स टेक्स केअर ऑफ फूल्स ऍन्ड ब्लाइन्ड -Providence takes care of fools and blind. )

काप गेले भोंकें राहिलीं–( प्रॉस्पिरिटि फ्लेड् बट प्राइड रिमेन्ड–Prosperity fled but pride remained. )

काळ आला होता पण वेळ आली नव्हती—( नॅरो इस्केप फ्राम एक्सट्रीम डेंजर -Narrow escape from extreme danger. )

कुसंतानापेक्षां निसंतान बरें—( बेटर नो चाइल्ड दॅन ए बॅड वन–Better no child than a bad one. )

खाई त्याला खवखवे—( गिल्टि कॉन्शन्स बाइट्स दि हार्ट-Guilty conscience bites the heart. )

दाम करी काम, बिबी करी सलाम—( मनी मेक्स् दि मेअर गो–Money makes the mare go. )

परस्वाधीन जिणें आणि पुस्तकी विद्या—( डिपेन्डन्स इज ए पुअर ट्रेड–Dependance is a poor trade. )

परसांतली भाजी—( ए ट्रॅफ्लिंग वन–A trafling one. )

पांचां मुखी परमेश्वर–( मेजॉरिटी वुइन्स दि पॉइन्ट–Majority wins the point. )

बळी तो कान पिळी—( माइट इज राइट–Might is right. )

भिकाऱ्या ओकारी—( बेगर्स आर डेन्टी–Beggers are dainty. )

वेळेवर वेळ शिमग्यावर खेळ—( फर्स्ट कम फर्स्ट सर्व्हेड–First come first served. )

वरातीमागून घोडें–( ए डे आफ्टर दि फेअर–A day after the fair.

---

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

## जनावरें व पक्षी यांचे आवाज.

| | | |
|---|---|---|
| अस्वलें गुरगुरतात | [ बेअर्स ग्राउल ] | Bears growl |
| कुत्रीं भुंकतात | [ डॉग्ज बार्क ] | Dogs bark |
| गाई हंबरतात | [ कौज लो ] | Cows low |
| गाढवें ओरडतात | [ ऍसेस ब्रे ] | Asses brey |
| घुबडें घू घू करतात | [ औल्स हूट ] | Owls hoot |
| डुकरें डुरडुरतात | [ पिग्ज ग्रन्ट ] | Pigs grunt |
| बैल डुरकतात | [ बुल्स बेलो ] | Bulls bellow |
| बेडूक डॉं डॉं करतात | [ फ्रॉग्ज क्रोक ] | Frogs croak |
| मांजरें म्याव म्याव करतात | [ कॅटस म्यू ] | Cats mew |
| मेंढ्या बें बें करतात | [ शीप ब्लीट ] | Sheep bleat |
| लांडगे कोंकावतात | [ वूल्व्हज हौल ] | Wolves howl |
| वाघ गुरगुरतात | [ टायगर्स ग्राउल ] | Tigers growl |
| सिंह गर्जतात | [ लायन्स रोअर ] | Lions roar |
| हत्ती चीत्कारतात | [ एलिफन्टस ट्रम्पेट ] | Elephants trumpet |
| कावळे काव काव करतात | [ क्रोज क्रो ] | Crows crow |
| चिमण्या चिंव चिंव करतात | [ स्पॉरोज चर्प ] | Sparrows chrip |
| पोपट बोलतात | [ पॅरटस टॉक ] | Parrots talk |
| माशा गुं गुं करतात | [ बीज हम् ] | Bees hum |
| कबुतरें गटुर्घुम् करतात | [ पिजन्स कू ] | Pigeons coo |

## कायदा व अदालत.

| | | |
|---|---|---|
| अपराधी | [ कल्प्रिट ] | Culprit |
| आरोप | [ चार्ज ] | Charge |
| अर्ज | [ पिटिशन ] | Petition |
| अधिकारी | [ अथॉरिटी ] | Authority |

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

| | | |
|---|---|---|
| अज्ञान | [ इग्नरन्स ] | Ignorance. |
| इंग्रजी राज्य | [ ब्रिटिश रूल ] | British Rule. |
| कचेरी | [ कोर्ट ] | Court |
| कायदा | [ लॉ ] | Law |
| ,, | [ ऍक्ट ] | Act |
| कैदी | [ प्रिझनर ] | Prisoner |
| कलम | [ सेक्शन ] | Section |
| इलाखा | [ प्रेसिडेन्सी ] | Presidency |
| काढून टाकणें | [ टु डिस्मिस ] | To dismiss |
| करार | [ ऍग्रीमेंट ] | Agreement |
| करारनामा | [ इन्डेन्चर ] | Indenture |
| कारकून | [ क्लार्क ] | Clerk |
| कळविणें | [ इन्फॉर्म ] | Inform |
| खून | [ मर्डर ] | Murder |
| खटला | [ केस ] | Case |
| कूळ | [ क्लायंट ] | Cliant |
| कायदेशीर | [ लीगल ] | Legal |
| गुन्हा | [ ऑफेन्स ] | Offence |
| गुन्हेगार | [ ऑफेन्डर ] | Offender |
| गुण | [ मेरिट ] | Merit |
| चालविणें | [ टु कन्डक्ट ] | To conduct |
| चोरी | [ थेफ्ट ] | Theft |
| चातुर्य | [ स्किल ] | Skill |
| चोर | [ थीफ ] | Thief |
| चौकशी | [ इन्व्हेस्टिगेशन ] | Investigation |
| जंगम | [ मुव्हेबल ] | Moveable |

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

| | | |
|---|---|---|
| जामीन | ( सिक्युरिटी ) | Security |
| जप्ति | ( अटॅच्मेन्ट ) | Attachment |
| जामीन | ( बेल ) | Bail |
| जप्त करणें | ( टु अटॅच् ) | To attach |
| झाडा-झडती | ( सर्च ) | Search |
| झोंप लागली | ( अस्लीप् ) | Asleep |
| दिवाळें | ( इन्सॉल्व्हन्सी ) | Insolvancy |
| दस्तऐवज | ( डॉक्युमेन्ट ) | Document |
| दिवाणी | ( सिव्हिल् ) | Civil |
| दाखल करणें | ( टु एक्झिक्यूट ) | To execute |
| खोटी साक्ष | ( पर्जरी ) | Perjury |
| दरसाल | ( पर ऍनम ) | Per annum |
| दिवाळखोर | ( बँक्रप्ट ) | Bankrupt |
| न्यायाधीश | ( जज् ) | Judge |
| पकडणें | ( टु अरेस्ट ) | To arrest |
| प्रतिवादी | ( डिफेन्डन्ट ) | Defendent |
| पाहून | ( सीइंग ) | Seeing |
| पोलिस-ठाणें | ( पोलिस्-स्टेशन ) | Police-station |
| राजद्रोह | ( सिडिशन ) | Sedition |
| देणें | ( टु रेन्डर ) | To render |
| फौजदारी | ( क्रिमिनल ) | Criminal |
| तपासणी | ( एक्झॅमिनेशन ) | Examination |
| दस्तऐवज | ( बॉन्ड ) | Bond |
| तहकूब करणें | ( टु पोस्टपोन ) | To postpone |
| दया | ( मर्सी ) | Mercy |
| धनको | ( क्रेडिटर ) | Creditor |

—

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

| | | |
|---|---|---|
| गहाण ठेवणें | ( टु मॉर्गेज ) | To mortgage |
| न्याय | ( जस्टिस ) | Justice |
| प्रतिज्ञा | ( स्वेअर ) | Swear. |
| देत | ( पेइंग ) | Paying |
| प्रश्न | ( क्श्चन् ) | Question |
| पुरावा | ( एव्हिडन्स ) | Evidance |
| फिर्याद | ( सूट ) | Suit |
| फौजदार | ( मॅजिस्ट्रेट ) | Magistrate |
| फोडून | ( ब्रेकिंग ) | Breaking |
| दर शेकडा | ( पर सेन्ट ) | Per cent |
| बेअब्रू | ( डेफमेशन ) | Defamation |
| पुरेसा | ( सफिशन्ट ) | Sufficient |
| पारख करणें | ( टु अॅप्रीशियेट ) | To appreciate |
| संपणें-वणें | ( टु फिनिश् ) | To finish |
| सरकार | ( गव्हर्मेन्ट ) | Government |
| हप्ता | ( इन्स्टॉलमेन्ट ) | Instalment |
| रिणको | ( डेटर ) | Debtor |
| सूचना | ( नोटीस ) | Notice |
| मृत्युपत्र | ( वुईल ) | Will |
| वस्तु, जिन्नस | ( आर्टिकल् ) | Article |
| नेलेल्या | ( कॅरीड् अवे ) | Carried away |
| वकील | ( प्लीडर ) | Pleader |
| ,, | ( सॉलिसिटर ) | Soliciiter |
| ,, | ( बॅरिस्टर ) | Barrister |
| हुकुमनामा | ( डिक्री ) | Decree |
| सोडणें | ( टु ऍक्विट ) | To acquit |



CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

| | | |
|---|---|---|
| साक्षीदार | ( वुइट्नेस् ) | Witness |
| गुन्हा नाकबूल करणें | ( टु प्लीड नॉट गिल्टी ) | To plead not guilty |
| गुन्हा कबूल करणें | ( टु प्लीड गिल्टी ) | To plead guily |
| वचनभंग | ( ब्रीच ऑफ प्रॉमिस् ) | Breach of promise |
| प्रकरण | ( चॅप्टर ) | Chapter |
| सबब | ( एक्सक्यूज ) | Excuse |
| भयंकर | ( हॉरिबल् ) | Horrible |
| लगेच | ( इमीजियटली ) | Immediately |
| मत | ( ओपीनियन ) | Openion |
| लिलाव | ( ऑक्शन ) | Auction |
| मंडळी | ( मेम्बर्स ) | Members |
| व्याज | ( इन्टरेस्ट ) | Interest |
| जरूरीचें | ( अर्जन्ट ) | Urgent |
| मालमत्ता | ( इस्टेट ) | Estate |
| स्थावर | ( इम्मूव्हेबल् ) | Immoveable |
| मालमत्ता | ( प्रॉपर्टि ) | Property |
| बचाव करणें | ( टु डिफेन्ड ) | To defend |
| वादी | ( प्लेन्टिफ ) | Plaintiff |
| शिक्षा | ( पनिश्मेन्ट ) | Punishment |
| विश्वासघात | ( ब्रीच ऑफ ट्रस्ट ) | Breach of trust |
| कोर्टाची बेअदबी | ( कन्टेम्प्ट ऑफ दि कोर्ट ) | Contempt of the Court |
| जामीन कबूल करणें | ( टु ॲड्मिट बेल ) | To admit bail |
| देहांत शिक्षा | ( कॅपिटल पनिश्मेन्ट ) | Capital punishment |

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

जामीनावर सोडणें [ टु रिलीज् ऑन बेल ] To release on bail.
साधी कैद [ सिंपल इम्प्रिझन्मेन्ट ] Simple imprisonment.
सक्त मजूरीची शिक्षा [ ऱ्हिगरस इम्प्रिझन्मेन्ट ] Rhigorous imprisonment.

## वाक्यें—Sentences.

कोणच्याहि तऱ्हेनें राजाच्या, अथवा राणीच्या किंवा त्यांच्या अधिकाऱ्याच्या अथवा अधिकाऱ्यांच्या मर्जीविरुद्ध बोलणें अथवा लिहिणें म्हणजे राजद्रोह करणें असा अर्थ हल्लीच्या हिंदुस्तानच्या इंग्रजी राज्यांत करण्यांत येतो—( दि मीनिंग ऑफ सिडिशन इज् मेड इन दि प्रेझेंट ब्रिटिश रूल इन इंडिया इज टु स्पीक ऑर टु राइट इन एनी वे अगेन्स्ट दि किंग ऑर क्वुइन ऑर देअर ऑफिसर ऑर ऑफिसर्स मीन्स टु कमिट सिडिशन—The meaning of sedition is made in the present British Rule in India, to speak or to write in any way against the king or queen or their officer or officers means to commit sedition. )

अलीकडे असले गुन्हे सरकारच्या दृष्टीनें हिंदुस्तानांत फार होऊं लागले आहेत. —( नौ ए डेज सच ऑफेन्सेस आर ऑकरिंग ॲम्प्ली इन इंडिया, इन दि ओपिनियन ऑफ दि गव्हर्मेन्ट ऑफ इंडिया—Now a days such offences are occurring amply in India, in the openion of the Government of India. )

याचें कारण प्रजेंतलि असंतोष हें आहे असें प्रजेचें म्हणणें आहे—( दि सब्जेक्ट्स प्लीड दि रीझन ऑफ धिस ए डिसकन्टेन्ट—The subjects plead the reason of this a discontent. )

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

याचें मुख्य कारण नोकरशाहीचें वर्तन आणि, तिची जबाबदारी हेंच आहे असें प्रजेचें गाऱ्हाणें आहे—( दि कम्प्लेन्ट ऑफ दि सब्जेक्ट इन धिस रिस्पेक्ट इज बीइंग चीफ्ली अबाउट दि कॅरेक्टर ऑफ दि ब्युरॉक्रसी ॲन्ड इटस रिस्पॉन्सिबिलिटी–The complaint of the subject in this respect, is being chiefly about the character of the bureaucracy and its responsibility. )

नोकरशाहीला त्रासूनच हिंदुस्तानच्या अनाथ प्रजेनें स्वराज्याची मोहीम सुरू केली आहे—( इन गेटिंग ट्रबल्ड बाय दि ब्युरॉक्रसी, दि पुअर इंडियन सब्जेक्टस हॅव पिच्ड दि कॅम्पेन ऑफ स्वराज्य–सेल्फ–गव्हर्मेन्ट—In getting troubled by the bureaucracy, the poor Indian subjects have pitched the campain of swaraja–Self–Government. )

मी कोणालाहि हातावर पैसे देत नाहीं—( आय नेव्हर गिव्ह मनी ऑन क्रेडिट —I never give money on credit. )

एखादा जिन्नस गहाण ठेवाल तर पैसे देईन—( मनी वुड बि अडव्हान्स्ड इफ ए थिंग कॅन बि मॉर्गेज्ड–Money would he advanced if a thing can be mortgaged. )

मी गरीब असल्यानें माझ्याजवळ गहाण ठेवायला वस्तु कोठली असणार ?–(आय बिइंग पुअर व्हॉट ए थिंग आय शॅल हॅव टु मॉर्गेज ?—I being poor, what a thing I shall have to mortgage. )

दरसाल दर शेंकडा नऊ टक्के व्याज कोर्ट देवतें—( दि कोर्ट सॅक्शन्स नाइन पर्सेन्ट इन्टरेस्ट पर ॲनम्–The court sanctions nine percent interest per annum. )

कांहीं अत्यंत जरूरीच्या कामासाठीं मला पांच हजार रुपयांची रक्कम हवी आहे तेवढी तुम्ही मला मेहेरबानीनें माझ्या स्थावर मिळकतीवर द्या—( आय वॉन्ट ए सम ऑफ रुपीज फाइव्ह थौजन्ड फॉर सम अर्जन्ट पर्पझ, गिव्ह इट टु मी ऑन माय इम्मूव्हेबल प्रॉपर्टी, प्लीज—I want a sum of rupees five thousand for some urgent purpose, give it to me on my immoveable property, please. )

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

ह्या चोरानें घर फोडून त्याच्या वस्तु लांबविल्या तेव्हां घरांतल्या साऱ्या माणसांना झोंप लागलेली होती—( ऑल दि पर्सन्स इन दि हौस वेअर अस्लीप, व्हेन दॅट थीफ ब्रेकिंग थ्रू दि हौस कॅरिड अवे ऑल दि आर्टिकल्स—All the persons in the house were asleep, when that thief breaking through the house carried away all the articles. )

घराची भिंत फोडून चोर घरांत येत होता.—( थीफ वॉज एन्टरिंग दि हौस ब्रेकिंग थ्रू दि वॉल—Thief was entering the house breaking through the wall. )

मी आपल्या मृत्युपत्रांत धर्मादायासाठीं दहा हजारांची व माझ्या मुलासाठीं पंचवीस हजारांची रक्कम लिहून ठेविली आहे—( आय हॅव रिटन औट ए सम ऑफ टेन थौजन्ड फॉर चॅरिटि अॅन्ड ऑफ ट्वेन्टीफाइव्ह थौजन्ड इन दि नेम ऑफ माय सन—I have written out a sum of ten thousand for charity and of twentyfive thousand in the name of my son.)

माझा भाऊ आपल्या बायकोच्या नीच संगतीनें मला बुडविण्यास तयार झाला—( माय ब्रदर प्रिपेअर्ड हिम्सेल्फ टु रुइन मी बाय दि मीन कंपनी ऑफ हिज वाइफ—My brother prepared himself to ruin me by the mean company of his wife. )

त्यानें गोड बोलून मजपासून खोटी फारकत लिहून घेऊन मला घरांतून हांकून लाविलें—( ही वुइथ स्वीट वर्ड्स टुक ए रिटन डॉक्युमेन्ट ऑफ पार्टिशन फ्रॉम मी ऍन्ड ड्रिव्हन मी औट ऑफ दि हौस—He with sweet words took a written document of partition from me and driven me out of the house. )

वास्तविक म्हटलें तर त्यानेंच माझी खासगत स्थावर मिळकत गिळंकृत केली आहे ( टु स्पीक दि ट्रुथ, ही हॅज स्वॉलोड अप माय ओन प्रायव्हेट इम्मूव्हेबल प्रॉपर्टी—To speak the truth, he has swallowed up my own private immoveable property. )

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

इतकें असून, माझ्या मुलाचें संरक्षण तो धर्मादाय करतो असें तो प्रत्येकास सांगतो—( सच बिईंग दि केस, ही टेल्स एव्हरिबडि दॅट ही प्रोटेक्टस माय सन आऊट ऑफ चॅरिटि—Such being the case, he tells everybody that he protects my son out of charity. )

माझी नालस्ती करण्यांत तो भूषण मानतो—( ही टेक्स ऑनर इन डिफेमिंग मी —He takes honour in defaming me. )

माझेंच प्रथमच चुकलें. आतां ओरडून काय होणार ?—( आय मिस्टुक फर्स्ट. नौ व्हॉट इज दि यूस ऑफ बॉलिंग आउट—I mistook first. Now what is the use of bolling out. )

जाऊं दे. परमेश्वर त्याला आज ना उद्यां बघून घेईल—( लेट इट गो. गॉड विल मेक हिज जस्टिस वन डे ऑर अदर—Let it go. God will make his justice one day or other. )

तुमची इच्छा असल्यास त्याला मी तुम्हांला जामीन राहण्यास तयार करतो—( इफ यू वुइश, आय मे प्रिपेअर हिम टु स्टॅन्ड ए सिक्युरिटी फॉर यू—If you wish, I may prepare him to stand a security for you. )

आम्ही सकाळीं उठतांक्षणींच सर्व वस्तु चोरीस गेलेल्या आम्हांला आढळल्या—( ऍज सून ऍज वुइ गॉट अप इन दि मॉर्निंग वुइ फॉउन्ड ऑल दि थिंग्ज वेअर स्टोलन —As soon as we got up in the morning we found all the things were stolen. )

पोलीस-ठाण्यावर आम्ही त्याची वर्दी लगेच दिली—( वुइ ऍट वन्स गेव्ह इनफॉर्मेशन ऑफ इट टु दि पोलिस-स्टेशन—We at once gave information of it to the police-station. )

पोलिसानें त्याला कैद करून म्याजिस्ट्रेटपुढें हजर केलें—( पोलिस हॅविंग ॲरेस्टेड हिम, पुट बिफोर दि म्यॅजिस्ट्रेट--Police having arrested him put before the magistrate. )

त्याला पकडून मॅजिस्ट्रेटपुढें नेल्यावर त्याची चौकशी करण्यांत आली—( ही हॅविंग बीन ऍरेस्टेड ऍन्ड ब्रॉट बिफोर दि म्यॅजिस्ट्रेट, हिज इन्क्वायरी वॉज मेड—He

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

having heen arrested and brought before the magistrate his enquiry was made. )

त्याच्यावर खुनाचा आरोप शाबीत झाला, पण त्याला फांशीच्या ऐवजीं जन्मठेप काळेपाण्याची शिक्षा देण्याची न्यायाधीशानें दया दाखविली—( ही वॉज कन्व्हिक्टेड ऑफ मर्डर बट दि जज्ज शोड मर्सी इन् गिव्हिंग हिम् ए सेन्टेन्स ऑफ ट्रॅन्स्पोर्टेशन फार लाइफ इन्स्टेड ऑफ कॅपिटल पनिश्मेन्ट—He was convicted of murder but the judge showed mercy in giving him a sentence of transportation for life instead of capital punishment.

हप्त्यानें पैसे द्यावे असा त्याच्या खटल्याचा निकाल झाला—( ए डिक्रि वॉज पास्ट अगेन्स्ट हिम् टु पे दि मनि बाय इन्स्टॉलमेन्टस्—A decree was passed against him to pay the money by instalments. )

सध्यांच्या इंग्रजी नौकरशाहींत न्याय आणि दया यांचा अभाव झाला आहे अशी प्रजेची समजूत झाली असल्यानें, तिला राजद्रोही ठरविण्याचा प्रयत्न चालू आहे—(ए ट्रायल इज गोइंग ऑन टु स्टॅम्प औट दि इन्डियन सब्जेक्टस् ऍज डिसलॉयल, ऍज इट्स कन्व्हिक्शन हॅज बिकम दॅट देअर हॅज बिकम ऍन ऍब्सेन्स ऑफ जस्टिस ऍन्ड मर्सी इन दि प्रेझेन्ट ब्रिटिश बुरॉक्रसी—A trial is going on to stamp out the Indian subjects as disloyal, as its conviction has become that there has bebome an absence of justice and mercy in the present British bureaucracy. )

हा गुन्हा कायद्यानें इतका भयंकर ठरविला आहे कीं, त्याला कायद्यांत देहान्त प्रायश्चित्ताशिवाय दुसरी शिक्षा सांगितलेली नाहीं—( धिस क्राइम इॅज बीन डिक्टेटेड बाय लॉ सो मच हॉरिबल दॅट, लॉ इटसेल्फ टेंडर्स नो अदर पनिशमेंट टु इट बट ए कॅपिटल वन्—This crime has been dictated by law so much horrible that law itself tenders no other punishment to it but a capial one. )

आतां हे विषय संपवून, प्राचारिक वाक्यांच्या भागाकडे वळूं—(नौ लेट अस फिनिश दीज सब्जेक्ट ऍन्ड टर्न टु दि चॅप्टर ऑफ दि इडियॉमेटिक सेन्टेन्सेस—Now let

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

us finish these subject and turn to the chapter of the idiometic seutences. )

---

## प्राचारिक वाक्यसंग्रह.

[ The vocabulary of idiometic sentences. ]

अशा स्थितींत दुसरा मार्गच राहिला नाहीं--Under these circumstances no other course is open.

आनंदानें त्या जोडप्यांचीं मुखें प्रफुल्लित झालीं--The faces of those couples beamed with joy.

आईला आपल्या मुलाची फार काळजी असते--The mother is deeply interested in anxiety of her child.

अशक्ततेनें त्याचें कामांत लक्ष्य लागत नाहीं--Owing to the phisical weakness he cannot attend to business.

आतां तूं ज्याला आणला होतास, त्याच्या ऐवजीं दुसरा कोणी तरी घेऊन ये--Bring me some one else for the one you brought me just now.

आम्हीं परिणामाला भितों--We afraid of the consiquences.

आळस कुटुंबाचा वैरी असतो व शिवाय तो मोठा अनर्थकारी आहे--Sloth is the enemy of family and besides a productive of great evil.

मी सध्यां पैशाच्या टंचाईत आहें--Presently I am hard of money.

मी वाट पाहून कंटाळलों--I am sick of waiting.

माझ्यानें इतक्या लवकर कदाचित् येववणार नाहीं--I shall not be able perhaps to come so soon as that.

मीं सुताराकडून एक पेटी व एक पुस्तकें ठेवण्याचें कपाट करविलें--I got a carpenter to make a box and a cupbord for books.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

मी त्याचें दारूचें व्यसन घालविलें—I cured him of drinking vice.

मी आपल्यावरचें ओझें काढून घेऊन त्याच्यावर ठेवलें—I rid myself of the burden and put him in.

उद्योगाची संवय करून आळसाला झिडकारा म्हणजे दैव उघडेल—The fortune will smile on you when you will kick out the sloth and accustom yourself to habits of industries.

माझ्यावर त्यांची फार खप्पा मर्जी झाली—I have fallen down their downright displeasure.

माझी त्यांची ओळख करून दिल्यास उपकार होतील—I shall be obliged if I would be introdnced to him.

अजून त्याचा खोटा ग्रह कायम आहे—Yet his misapprehension is firm.

आपल्या मित्राचा त्याग केल्याबद्दल तिचा तुझ्यावर रोष झाला आहे—She accuses you of deserting your friend.

अर्थी दान महापुण्य—A gift in need is a gift indeed.

अती राग भीक माग—Passion leads to poverty.

अति तेथें माती—Excess leads to ruin.

अंधाच्या गायी देव राखतो—Providence takes care of fools and the blind.

अंधळ्याला लंगडा वाट दाखवतो—The blind leads the lame.

एकाएकीं हवेंत फारच गारठा पडला—The air grew suddenly very cold.

एकसारख्या विचारतरंगांनीं तो भांबावून गेला—He was overwhelmed by a rushing chain of thoughts.

अतिपरिचय खोटा मान राहात नाहीं—Too much familiarity breeds contempt.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

अजून आपला पहिलाच दिवस—There is no change as yet.

अंधळे आणि अज्ञाण सारखेच—Ignorance has no light.

अर्थात्च बहुजनमत सुधारकांच्या विरुद्ध होतें—Of cource the public openion was against the reformers.

अशा तऱ्हेच्या अनेक संकटांनींच त्याला तसा बनविला—Many such evils have made him so.

आपल्या बायकोची तो व्यवस्था करून ठेवणार आहे—He is going to leave fortune for his wife.

आपली स्थिति बरी आहे असें त्याला लवकरच आडळून आलें—He soon found himself in easy circumstances.

आठा दिवसातला धूम धडाका पार नाहींसा झाला आहे—The din and struggle of the week is at an end.

आपला मुलगा श्रीमंत होणार या आशेनें तो गुंग आहे—He is indulged in the hope that his son would turn out a rich one.

मीं केलेल्या कृत्यांचा जेव्हां माझ्या मनांत विचार येई तेव्हां मला आनंद होई—I felt glad when I reflected on my deeds.

मला कोणी ढकलीलसें वाटलें—I fancied some one would push me.

मी त्याला पुष्कळ बोललों, पण रामाचें नांव, एक नाहीं कीं दोन नाहीं—I took him right and left but he turned a deaf to all.

आतां आपलें कसें होणार हा त्याला मोठा विचार पडला आहे—His uncertain future is the cause of the great anxiety to him.

आपल्याला कैदेंत जावें लागणार हा विचार त्याच्या मनांत येतांक्षणींच तो मूर्च्छित झाला —He became senceless at the thought of his being imprisoned.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

माझी बुद्धि काव्यांत चालते तशी गणितांत चालत नाहीं—I have no aptitude for mathematics as I have for literature.

मला त्याचा उलगडा होत नाहीं—I am at my wits end.

मला फुरसतीची वेळच नाहीं—I have no time to spare.

माझ्याबद्दल त्याचा जो विपरीत ग्रह झाला आहे, त्याचें कारण त्यालाच ठाऊक आहे—He himself knows the cause of prejudice against me.

आमच्यावर आलेल्या संकटांबद्दल पुसूंच नका—Our troubles are indescribable.

आपल्या मित्राचें काय झालें तें त्याला माहीत होण्याचें कोणचेंच साधन नव्हतें—He had absolutely no means of knowing the fate of his friend.

आपली पूर्वीची बाकी चुकति करायला सैनिकांनीं इषारा दिला—Soldiers gave hint to pay the arrears.

आपण पास होणारच असा त्याला पक्का भरंवसा होता—He was fully confidant of his success.

मी जावें असें त्याच्या मनांत होतें—He was desirous of my going.

आजारीपणामुळें त्याला सभेला हजर राहतां आलें नाहीं—Indisposition prevented him from going to the meeting.

आजाऱ्यानें थंड हवेंत फार वेळ राहूं नये—A sickly one should not expose to cold weather for a long time.

आपणांवर जीं जीं संकटें येतील तीं तीं भोगण्यास शांतपणें तयार असलें पाहिजे—We must be prepared to bear up patiently against the misfortunes that may befall us.

ईश्वर तुझें कल्याण करो—May God bless you.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

हे चरित्र श्रवण करणारा पापापासून मुक्त होतो—He who listens to this narative becomes free from sin.

जेवणापूर्वी स्नान करीत जावें—One should take bath before a meal.

कथा आटोपल्यानंतर श्रोत्यांना खिरापत वाटतात-Sweetmeats are distributed among the audiance after a serman is up.

या धंद्यांत कोणासच फारसा नफा मिळत नाहीं—Nobody accrues much profit in this business.

उघळेपणाचें फळ दारिद्र्य आहे—In temperance accounts for poverty.

त्यानें चोवीस तास अन्नपाण्यावांचून काढले-He abstained from food and water all the twenty-four hours.

त्याच्या मित्रानें त्याला हालवून त्याच्या मनोराज्याचा भंग केला-His friend startled him by moving from his brown study.

त्याची विचारशैली चांगली असली, तरी मुद्देसूद नाहीं—His reasoning is good but altogether void of the mark.

पावसाची पर्वा नाहीं, तावडतोब निघून जा—Never mind for the rain, go at once.

त्यानें अरण्यवास पत्करला व तो कराराप्रमाणें वागला—He abandoned himself to forest and abided by the contract.

सद्धर्मानें वागणाऱ्याला आशीर्वाद मिळतात—A virtuous one gets blessings.

खाण्यापिण्यांत नेमस्तपणा ठेवल्यानें मनुष्य निरोगी राहतो—The moderation in eating and drinking makes a man healthy.

दिवसभर सारखा पाऊस पडल्यानें हवेंत गारठा आला आहे—It was constantly raining whole day and hence there is cold in the wether.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

तुम्हांला तुमच्या कामांत यश येवो—May you prosper in your undertaking.

डोंगर पोंखरून उंदीर काढण्यांत काय अर्थ--What is the use of making much ado about nothing ?

ऐकावें जनाचें करावें मनाचें--Listen to people but obey your conscience.

राईचा पर्वत करूं नको, आणि रावाचा रंक होऊं नको—Do not mould mole-hill into a mountain and pauper into a prince.

अकबरानें राज्यांतले अनेक दोष दूर केले, तसे इंग्रज अधिकारीवर्ग करील तर त्याचा फायदा होईल—It will be profitable for the British beauracracy, if it will remove or rectify the abuses in the state as Akbar did.

राजपुत्र भिकाऱ्याच्या वेषांत गुप्तपणें रात्रीं फकीराच्या झोंपडींत गेला—The prince visited the Fakir's hut secrely in the night under begger's garb.

शहाणा बोलून दाखवील काय ?--Will the wise keep out his counsel ?

माझा काशीपासून रामेश्वराच्या प्रवासाचा खर्च एक हजारांचा झाला— The expences of my jurney from Banaras to Rameshwar amounted to one thousand.

त्याचें कसें काय चाललें आहे ?—How it fares with him.

त्याला आपल्या पूर्वजांच्या पराक्रमाविषयीं बोलतांना ऐकलें म्हणजे करमणूक होते—It is very interesting to hear him talk his forefather's exploits.

तो केव्हां येईल नकळे—Can't say anything about his coming.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

त्याच्यावर राजद्रोहाचा आरोप शाबीत होऊन, त्याला जन्मठेप काळ्यापाण्याची शिक्षा झाली—He was convicted of sedition and sentenced to transportation for life.

मी स्वतः त्या पत्रांतला मजकूर वाचूनच हें बोलतों आहे—I am speaking this having read the contents in that letter.

पावसाळा सुरू झाला आहे—The rains have set in.

पेटींतलि ऐवज बरोबर नाहीं—The contents of the box are not intact.

आमच्या व्यवस्थेंत कांहीं न्यूनता आहे असे वाटतें—Our arrangements are somewhat incomplete.

आमच्यावर होणार असणाऱ्या हल्याला तोंड देण्याची पुरी तयारी केली पाहिजे—We must make complete preparation to oppose the would be invasion on us.

त्यानें गणिताचा अभ्यास भास्कराचार्यांच्या शिकवणीप्रमाणें केल्यामुळेंच त्याला केम्ब्रिजच्या विश्वविद्यालयांत पहिलें स्थान मिळालें—He stood first at the university of Cambridge, only because he had studied the mathematics according to the teachings of Bhaskaracharya.

एवढ्यानेंच युवराजाचा आदरसत्कार कसा संपणार ?—How the attentions of the crown prince will be stopped at this point!

अपराधाच्या स्वरूपाची चौकशी झाली पाहिजे—Inquiries must be instituted into the nature of the offence.

पुढच्या तजविजीचा त्यांनीं विचारच केला नाहीं—They did not think over about the steps that are to be taken.

खरा प्रकार सांगून त्याची भीति चटकन् दूर करा—Quickly calm his fears by telling him the fact.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

ह्याला त्याबद्दल हुकूम मिळालेला आहे--He has received orders for the same.

त्याच्या इच्छेला मान देणें हें माझें कर्तव्य आहे--I am in duty bound to yield to his wishes.

टिळकांनीं स्वदेशाची खरी स्थिति आपल्या देशबांधवांना सांगून अधिकारी वर्गाचें दोषाविष्करण केल्यामुळें त्यांना सहा वर्षें काळ्यापाण्याची शिक्षा झाली—Mr. Tilak got a sentence of six years transportation, only because he pointed out the faults of the beauracracy and exhibited the true condition of his couutry before his country-brotherin.

नेल्सनच्या जयानें बोनापार्टचे सारे बेत फसले--Nelson's victory frustrated all the designs of Nepolian.

तुम्ही स्वदेशसेवा स्वीकाराल तर तुमच्या कुटुंबाचा जिमा मी पतकरीन--I shall undertake to care for your family if you will undertake to serve your mother-country.

जनतेची अतीशय गर्दी उसळल्यामुळें थोरला दिवाणखाना भरून जाऊन आसपासचे रस्तेहि बंद पडले--Having bounced up the concourse of people the grand hall was overcrowded and blocked up the adjoining streets too.

रस्त्यांतून मनुष्यांची अत्यंत गर्दी उसळली होती—The streets were overthronged by the people.

क्रॉमवेलच्या मृत्यूनें प्युरिटन अमलाची घडी मोडली—The death of Cromwell disfolded the rule of Puritains.

उपहारगृहें फार झाल्यानें डॉक्टरांच्या धंद्याला आणि नव्यानव्या रोगांच्या साथींना तेजी आली आहे—The refreshment bars being widely spread, a push has been given to smartain the business of doctors and new epidemic diseases.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

पूर्वी मराठी किंवा मोंगली राज्यांत सध्यासारखे कज्जेदलालीचा धंदा करणारे वकील नव्हते--Formerly there were no pleaders to set up a business of contest in the Maratha or Mongul empires, as they are at present.

असले दलाल इंग्रजी राज्यांत सध्या गल्लीकुचींत पसरल्यामुळेंच भाऊबंदकीला ऊत येऊन परकीयांचें कल्याण होतें आहे--Such brokers having been spread at every hook and nook in the British Rule, the brotherly disaffection has been overflooded and hence the welfare of the foreigners.

ही स्थिति पाहून दुःखानें तोंडांतून शब्दहि उमटत नाहीं--Looking at this state of condition sorrow deprives of speech.

दुःखानें मन सद्गदित होतें--The mind becomes oppressed through vehement of emotion.

अपघातानें त्याचे डोळे जाऊन शरिर क्षीण झालें--The accident deprived him of his eye-sight and shattered his frame.

तो केवळ आपल्या हुशारीनेंच उच्च पदवी मिळवील--He will rise to an exalted position by his own abilities only.

टिळक असोत कीं गोखले असोत,दोघांच्याहि महत्वाकांक्षेची मर्यादा एकच होती, पण मार्ग मात्र परस्परभिन्न होते--Let there be Tilak or Gokhale, their goal of ambition was one and the same, but their ways were oontrary.

म० गांधींचें ध्येय तरी त्यांच्याच प्रमाणें स्वराज्य हेंच आहे--Mahatma Gandhi bears the same ideal of Swarajya which they had.

स्वतःच्या राजाला ठार मारणाऱ्या इंग्रजांइतके हिंदी लोक अराजनिष्ठ होणें शक्य नाहीं--It is impossible for Iudians to turn out disloyal as to kill their own king like the English people.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

एकपत्नित्व, बहुपत्नित्व, आणि अनेकपतित्व या गोष्टी सोयीसाठींच प्रचारांत येतात—Monogony, poligamy and marrying husbands more than one come in practice through convenience.

आर्यधर्मशास्त्राप्रमाणें मुलांच्या अभावीं, मुलींचा हक्क आपल्या आईबापांच्या इंपत्तीवर सारखाच पोंचतो; पण मुसलमानी शास्त्राप्रमाणें, वडिलार्जितावर मुलांचा व मुलींचा हक्क सारखाच पोंचतो—Under the Aryan Law, female children are equally entitled to their perantal property in the absence of male children: but according to the Mahomedan Law, male and female children are equally entitled to their heridetary estate.

माझें घड्याळ अर्ध्या तासानें मागें आहे आणि तुझें पाव तासानें पुढें आहे—My watch is half an hour slow and your's quarter of an hour fast.

स्टँडर्ड टाइम बॉम्बे टाइमपेक्षां ३९ मिनिटांनीं पुढें आहे—The Standard time is39 minutes in advance than that of Bombay time.

शाळा अकराला भरून जरी पांचाला सुटते, तरी मधली सुटी एक तासाची असते—Though the school meets at 11 A. m. and closes at 5 P. M., yet there is a recess for one hour between.

बापाच्या धाकानें मुलगा नाटकांत पळाला—The boy fled away in a dramatic company, through the fear of his father.

प्रियपत्नीच्या विरहानें तो झुरणीस लागून शेवटीं मेला—He died by the anguish of the seperation of his beloved wife.

पुणें व मुंबई येथें दोन निरनिराळ्या सभा एकेच दिवशीं त्यांच्या अध्यक्षतेखालीं भरल्या—Two seperate meetings were held under his presidentship at Poona and Bombay, on the same day.

शेवटच्या पेशव्यानें म्हणजे दुसऱ्या बाजीरावानें तह केला तेव्हां त्याच्या चेहेऱ्यावर निराशेची पूर्ण छाया पसरलेली होती—There was full expression of



CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

dispair on the face of the last Peshwa, i. e. (that is) Bajirao II. when he concluded the treaty.

इंग्रजांच्या राज्यांत सर्वत्र शांतता नांदते असें म्हणण्याचा कालपर्यंत परिपाठ होता; पण आज तो साफ उडाला—Such was the practice of speaking till yesterday, that under the British Rule, peace rules every where, but that idea has been gone to dogs to-day.

पेशवाईत विद्येला व कलाकौशल्याला बरेंच उत्तेजन असण्याचें कारण, तें स्वराज्य होतें—There was a considerable encouragement under the Peshwa rule to Learning and Skill art, only because it was a Self Government, i. e. Swarajya.

नीग्रो लोकांत जशी एक विलक्षण समज आहे, तशी झुलू लोकांत देवाची कल्पनाच नाहीं—As among the Negros there is a curious notion, so among Zooloos there is no idea of what God is.

त्या दोघांत पुढीलप्रमाणें संभाषण झालें. तूं मूर्ख आहेस. मी शाहणा आहे—The following conversation took place between them You are a fool. I am wise enough.

त्या गोष्टींत शहाणपणा नाहीं, म्हणून, ती गोष्ट तुमच्या आमच्यांतच राहूं द्या—Let that thing be between ourselves only because there is no wisdom in that act.

असहकारितावाद्यानें कोणच्याहि प्रकारें अपराधी या नात्यानें इंग्रजी कोर्टात, त्याच्यावर चाललेल्या खटल्याला त्यानें मदत करतां कामा नये, हें असहकारितेला पाहिजे आहे—Non-co-operation requires that no accused should give any help whatsoever to the proceedings in the British Court in which he is tried.

आम्ही स्वतः जर खालच्या वर्गातील लोकांना अस्पृश्य मानून गुलामांसारखे लेखतों, तर आम्हांला आमच्या गुलामगिरीबद्दल भांडण्याचें कारणच नाहीं—If we take the lower class people as untouchable and treat

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

them as slaves, then we have no right to quarrel for our own slavery.

आपसांतील आमची जुलूमजबरी आणि हेवा हेंच खरोखर सध्यांच्या परकीय सत्तेचें मुख्य कारण आहे—The oppression and envy of us of our own kith and kin have created the root of the present foreign Government.

ह्यांतून जर आम्ही विनशर्त आपले गुलाम सोडविले नाहींत, तर आमची तरी गुलामगिरींतून सुटण्याची आम्ही आशा कां करावी—If we perpare not unconditionally to enfrunchise our own slaves, then why should we hope to get out ourselves from the bonds of slavery?

आमच्या राजकर्त्यांच्या चुका दुरुस्त• करण्याच्या आधीं आम्ही आमच्यांतील अस्पृश्यतेचा बीमोड केला पाहिजे—-We must first cast out the beam of untouchability from our own eye, before we attempt to remove the mole from that of our rulers.

थकल्यामुळें त्याच्यानें चालवेना आणि इतर अनेक कारणांमुळें त्याच्यानें सभेलाहि येववेना—He could not walk from fatigue and for some other reasons he could not attend the meeting.

मी कधींच पाहिले नाहीं असें एक सुंदर नाटक काल रात्रीं पाहिलें—I Audianced such a beautiful drama last night, that I had everseen.

काळोखांतला तो भयंकर प्रकार पाहून, नवखा गृहस्थ भेदरून गेला—The stranger stood aghast at the dreadful sight in the darkness.

मला जयाची खात्री नाहीं, पण तुम्हा आहे काय ?—I am diffident of success, but are you sure?

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

ते दुसऱ्यांच्या मोठेपणाचा हेवा करतात आणि आपल्या नीचपणाचीं फळें भोग-तात—They envy other's greatness and suffer the consequences of their own meanness.

आपल्याला चहूंकडे सीधा रस्ता मिळेल असें नाहीं—It will not be to find our ways everywhere.

आपल्यास नेहमीं आगगाडीचा रस्ता मिळेल असें नाहीं—We shall not always be able to take the railway.

केव्हां केव्हां आपल्याला बैलगाडीनें किंवा पायींच प्रवास करावा लागेल—Sometimes we will have to travel in a bullock-cart or even to walk.

चला तर मग, पहिल्यांदा आपण आगगाडींतून थेट उत्तरेकडचा हिमालयाचा रस्ता गाठूं—Let us then, first we take the train and make our way to the far North, to the Himalaya mountains.

अनेक यात्रेकरू दर वर्षी उन्हाळ्यांत केदारनाथाला जातात—Many pilgrims go to Kedarnath every year in the summer.

तें देऊळ आपल्या दृष्टिस पडेपर्यंत आपल्याला मोठाल्या देवदारांच्या जंगलांतून जावें लागून, अनेक मैलपर्यंत बर्फ ओलांडावें लागेल—We shall have to struggle through forests of deal trees and cross miles of snow, till we see the temple before our eyes.

सूर्यकिरणांत ते डोंगर कसे चकाकतात ?—How the mountains shine when the sun-light fall on them ?

आतां आपण परतूं आणि गंगानदीच्या प्रवाहानें जाऊं—Now let us return and follow the Ganjis in its course.

ती हरिद्वारीं पोंचेपर्यंत प्रथम खडकांवरून उड्या घेत घेत मोठ्यानें गर्जना करीत जाते—At first it goes leaping down over the rocks with aloud uprour, till it reaches Haridwar.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

वाराणशी क्षेत्र हें हिंदूंचें मोठें पवित्र स्थान आहे–Benaras is the most sacred place of the Hindus.

ज्या ठिकाणीं गंगा शतधा होते, तेथें कलकत्ता शहर वसविलेलें आहे—Just where the Ganjis break into several branches, Calcutta has been built.

इंग्रज त्याला कलकत्ता म्हणतात; पण त्याचें मूळचें नांव कालिकत्ता असें आहे—English call it Calcutta; but its original name is Kalikatta.

कालिच्या कत्याची म्हणजे तिच्या पायाच्या अंगट्याची तेथें पूजा आहे—There is a worship of Kali's Katta, means the thumb of the Kali's foot.

एलोरचें लेणें सर्वांत फार मोठें आहे—The cave of Ellora is the largest of all.

एका रानांत एकदां एक हरिण राहात असे व तें झाडावरून पडेल तेवढेंच फळ खात असे—Once upon a time there was a certain deer who lived in a forest and used to eat the fruit which fell from the tree.

वाळवंटांत उंटासारखा उपयोगी पडणारा एक उंटच–Camel is the only animal that is comfortable in the sandy desert.

त्याच्या पोटांत स्वच्छ पाण्याचा सांठा असतो—He carries a store of pure water in his stomach.

उत्तरेकडच्या घाटमाथ्यावरील टेकड्यांवर जे अनेक पडके किल्ले आहेत ते पूर्वीच्या मराठ्यांनीं बांधलेले होते—In the Narthern Ghats there are many fallen fortresses among the hills, which were built by the old Mahrathas.

आतां आपण मुंबईच्या बंदराच्या बाहेर पडत असून, तें उंच दीपगृह थोडक्यांतच मागें टाकलें आहे—We are moving out of the harbour of Bombay, and the tall light-house is soon left behind.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

